# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## अनुक्रमणिका

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## संघर्षाची दोन टोके – प्रतापगड आणि विजापूर






शिवाजी महाराजांनी अफ़झलखानाला मारले. या लढ्यातील अफ़झलखानाच्या बाजूने लष्करी चालींच्या मांडणीतून त्याचे ध्येय धोरणावर, केलेल्या खेळींवर प्रकाश टाकायचा प्रयत्न... इतिहास जेत्यांच्या बाजूने लिहिला जातो असे म्हणतात.

जे हारतात त्यांची बाजू काय असेल? त्यांच्या हातून काही गफलत झाल्या त्यामुळे जिंकलेली बाजी हरायची वेळ आली? याचा ओहापोह करायला हवा असतो. तो केला जातोच असे नाही. शिवाय केला तर आपल्या चुका इतरांना कळून येऊ नयेत म्हणून असे *अहवाल दाबून ठेवले जातात.

काही काळानंतर हार झालेल्या संग्रामातील मनुष्य, धन, वैभव, प्रतिष्ठा यांची हानी झाली तरी ती लढाई खरे तर आम्हीच जिंकली होती असे स्वतःची पाठ थोपटून म्हणण्याचा प्रघात पडतो. असो.

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग १ विषयप्रवेश




## भाग १ प्रतापगडाची उलटवलेली बाजी -विषय प्रवेश

इतिहासाच्या पानांवर बरेच काही लिहीलेले नसते. कारण तसे पुरावे अनुपलब्ध असतात. पण ते समजावून घेणारे डोळे आणि कान असतील तर छोट्या टिंबाना जोडून काही शोधता येईल का असा प्रयत्न करायला काय हरकत आहे?

शिवाजी महाराजांना सुपर मॅन बनवले जाऊ नये. कल्पकता, चातुर्य, साहस, मिळालेल्या नैसर्गिक साधन संपत्तीचा सुयोग्य वापर करणारे, विपरीत परिस्थितीत मानसिक संतुलन ठेवण्याची कला प्राप्त थोर सेनानी म्हणून त्यांच्याकडे पाहिले जावे. दरवेळी नव्या युक्त्या वापरून समोरच्या व्यक्तीला, सेनेला नामोहरम करण्याचे कसब त्यांना जागतिक कीर्तीचे महान सेनापती, जनसामान्यांच्या आशा आकांक्षा पूर्ण करायला सदैव तत्पर चारित्र्यवान राज्यकर्ता म्हणून प्रतिष्ठा प्राप्त करून देते.

त्यांचे विरोधक अशा सद् गुणांचे नसतील तर काय होते ते आपणास माहित आहे. म्हणून त्यांनी तयार केलेल्या संकल्पना, युद्ध नेतृत्वाची दखल घेतली पाहिजे. पुढच्या काही भागात अफझलखानाच्या मोहिमेच्या संदर्भात असाच एक शोध.

*अलिकडच्या काळात पाकिस्तानात सन १९७१ च्या पराजयाची कारणे शोधायचा अहवाल, सन १९९९ कारगिल युद्धातील घटना व हानी यांचा अहवाल प्रकाशित केले नाहीत. २५/११ च्या मुंबईवरील दहशतवादी हल्ल्याचा शोध अहवाल पाकिस्तानात का उघड केला जात नाही? असा प्रश्न खुद्द नवाज़ शरीफ पंतप्रधानपदावरून काढून टाकल्यावर मुद्दाम प्रेस कॉन्फरन्स बोलावून विचारत होते!
१९६२ च्या चीन आक्रमणानंतर भारतीय लष्कराने तयार केलेला टॉप सिक्रेट अहवाल फक्त 'फॉर युवर आईज ओन्ली' असा शिक्का मारून एका अर्थाने लपवला जातो. लेफ्टनंट जनरल शेकटकरांनी तो प्रत्यक्ष पाहिल्याचे सांगताना, तो अहवाल सेनेतील इतर वरिष्ठ अधिकाऱ्यांना देखील पहायला अशक्य असल्याचे नोंदवले आहे.

## शिवाजी महाराजांचा अश्वारूढ पुतळा



सध्याच्या काळात दिसणाऱ्या नकाशात जुन्या वास्तूंची ओळख



## मिपावर दुर्गविहारींच्या सुचना -

उत्कंठावर्धक मालिका वाचायला मिळणार याचा आनंद झाला आहे. लवकर पुढचा भाग लिहावा. पहिला फोटो, किंवा व्हिडीओ जे काही आहे ते दिसत नाही. शिवाय प्रतापगडाच्या नकाशामध्ये दोन बदल करता येतील.

१ ) दक्षिण बुरुजाला "रेडे बुरुज" असे नाव आहे, तो बदल करता येईल.

२ ) अफझल बुरुजाच्या एवजी "जिवा महाल बुरुज" असे नाव दिले तर अधिक योग्य असे वैयक्तिक मत आहे.

**मिपावर 5203 वाचने**



# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग २ अफ़झलखानाचा पुर्व परिचय

प्रतापगडाची उलटवलेली बाजी – भाग २ अफ़झलखानाचा पुर्व परिचय -



**मुगलांची सत्तास्पर्धा –**

**मुगलांची सत्तास्पर्धा – राजधानीपासून दूरवर तकलादू शामियान्यात शिरायला सोईचे असावे... वरील प्रातिनिधिक चित्र खालूनवर पहात गेले तर...**

**बंदुकधारी आपल्याबरोबर सैनिकांना गोळा करून वाटेतील लोकांना मारून राजाच्या आसनापर्यंत पोहोचतो. तिथे लहानवयाच्या नामधारी राजकुमाराला कोंडाळे केलेले दरबारी वाचवतात. कधी बंड होते, कधी बिमोड केला जातो पण सत्ता संघर्ष सुरुच असतो... राजाने लक्षात ठेवायचे असते त्याचा कधीही, कुठेही, कोणीही जीव घेऊ शकतो.**

१६३६ साली मुगलांनी अहमदनगरची निजामशाही बुडवली. त्यांचा मुलुख आदिलशाहीशी वाटून घेतला. १६५६ साली आदिलशाही संपवण्यासाठी दिल्लीहून शहाजहान काही कारवाई करत होता. औरंगजेब तेंव्हा दख्खनचा सुभेदार होता. १६५७ सालापासून शहाजहान आजारी पडत असल्याने दिल्लीतील तख्तावर अधिकार मिळवायला ४ भावात वैर वाढून इतर राज्य कारवायांना दुय्यम स्थान दिले जाऊ लागले. भावांचा बंदोबस्त करून शहाजहानला आग्र्याच्या लाल किल्ल्यात नजरकैदेत करून औरंगजेबाने दिल्लीतील लालकिल्यातून स्वतःबादशहा झाल्याचे फर्मान काढले. त्याच्या लेखी शिवाजी हा आदिलशाह विरुध्द बंड करणारा एक छोटा जमीनदार होता.

# आदिलशाहीतील कमकुवतपणा




**अदिलशाहीची व्याप्ती** - १६५६ साली मुहम्मद आदिलशाह वारला. त्याच्या कारकीर्दीत बांधलेल्या गोल घुमट (१६२७ ते १६५५) वास्तूत नंतर त्याची कबर बनवली गेली. त्याची बेगम साहेबाने (गोवळकोंड्याच्या मुहंमद कुतुबशाहची मुलगी - मराठीत बडी साहेबीण म्हणायचा प्रघात आहे.) अलि आदिलशाह या कोवळ्या सावत्र मुलाला गादीवर बसवले आणि तीच पुढाकार घेऊन राज्य करू लागली. आदिलशाही शिया पंथीय होती. त्यात उत्तरेतील सुन्नी पठाणी सरदारांचा भरणा होता. मराठ्यांच्या जहागीरदारांचा एक गट होता. शहाजीराजे शिया पंथीय गटात तर बाजी घोरपडे सुन्नी पठाणांच्या गटात असल्याने ते एकमेकांत वैर धरून होते. शिवाय सिद्दी आफ्रिकन गुलाम वंशाचे सरदार आपापल्या सैन्यासह आपला वेगळा दबाव गट करून होते. इखलासखाना सारखे काही सरदार तोफा बाळगून त्यांना लागणारे गोळे, स्फोटक दारूचे कारखाने, अवजड सामान वाहून न्यायला चाकांचे लाकडी गाडे, बळकट बैल, उंट, हत्ती अशी जनावरे व त्यांच्या वर देखरेख करणारे कामगार, शिक्षित तोफची गोलंदाज असे त्या काळात पुढारलेली शस्त्रे, ती चालवणारे तज्ज्ञ बाळगून असत. ते दोन्ही गटात गरजेनुसार सामिल होत. आदिलशाहीत कामकाज स्थानिक भाषेत चालत असे. सरमिसळ झाल्याने इतरांना मराठी, कानडी, तेलुगू निदान समजत असे. बाकीच्या गैर मुस्लिम सरदारांना दख्खनी इराणी पर्शियन मिश्रित भाषेतून बोलायचा सराव असे. घरी मराठीत, ऑफिसात इंग्रजीत, बाहेर हिंदीतून बोलण्याचा प्रघात सध्या आहे तसेच काहीसे.

आपल्या भागातील शेतीमालाचे, उद्योग व्यवसाय साधनातील उत्पन्नाचे काही भाग सरकारात जमा करून उरलेल्यात आपल्या भागातील तरुणांना शेतातील कामे संपल्यावर शस्त्रे चालवायचे शिक्षण देऊन, घोडेस्वारी, तिरंदाजी, तलवारीचे हात, भाले, बरचा नेम धरून फेकून मारायची कला शिकून प्रवीण करत असत. वेळोवेळी शत्रूच्या पराभवानंतर त्यांनी टाकलेली जनावरे, शस्त्रे याचा वापर करून ३ -४ महिन्याच्या शिक्षणासाठी - (पूर्वी मोठ्यांच्या हाताखाली काम करत राहून शिकायची प्रथा होती.) सैन्य भरती केली जात

असे. त्यातून स्वतःचे सैनिक, घोडे, वाहतूक जनावरे, शस्त्रे व हाताखालची गडी माणसे राखून असलेले शिलेदार होते. तर काही तरूण वेळ आली की जहागीरदारांची घोडी, हाताखालची माणसे, शस्त्रे घेऊन सैन्यात दाखल होत.

आदिलशाहीतील वर्चस्वासाठी कारस्थाने होत होती. रणदुल्लाखान सरदारांच्या गटाचे वर्चस्व त्यांनी जिंकलेल्या लढायांमुळे, प्रदेशामुळे वाढले होते. शहाजी राजांच्या दलबदलू प्रकारामुळे त्यांना कर्नाटकात सुभेदार बनवून मुगल, निजाम यांच्यापासून दूर ठेवून सन्मान ही दिला गेला. वसई, भिवंडी, कल्याण, चौल, उत्तर कोकण भाग, दाभोळ, राजापुरी, अगदी मालवण, सावंतवाडी पर्यंतच्या किनारपट्टीवर मुगलांच्या दुर्लक्षाची संधी साधून जबरदस्त सरदारांची नेमणूक गरजेची होती. शिवाजी महाराजांकडून मार खाल्ल्यामुळे पुरंदर किल्ला फतेहखानाला न घेता माघारी यावे लागले. या पार्श्वभूमीवर विजापूरच्या सत्तावर्तुळात विचार करून अफ़झलखानाला सिवाच्या बंदोबस्तासाठी तैनात करण्यात आले. कोकणातील किल्ले ताब्यात ठेवणे, बंदरातील विदेशी जहाजांवर धाक जमवणे, व्यावसायिकांकडून जकात वसुली, भूधारकांकडून शेतसारा वसूली अशी कामे तातडीने करून आदिलशाहीतील मावळ, बालाघाट, जाहगिऱ्यातील विस्कळीतपणा घालवायला अफ़झलखानापेक्षा सुयोग्य सरदार कोणी नव्हते हे लक्षात येते.

## अफ़झलखानाचा पूर्व परिचय

अफ़झलखानाची देहयष्टी भक्कम होती. ४० पेक्षा जास्त वयात पोट सुटलेले असूनही त्याच्या हालचालीत चपळता होती. दररोज शस्त्रे चालवायचा सराव, व्यायाम, भरपूर आहार, यामुळे त्याला आपल्या कर्तृत्वाचा अभिमान होता. दरबारात वयोवृद्ध वरिष्ठ पदाधिकारी, इतर सेनानी त्याला टरकून असत. त्या काळातील प्रथेप्रमाणे अनेक बायका त्याच्या जनानखान्यात असत. मुलकी शासनात बारकाईने विचार करून तो न्यायनिवाडा करत असे. प्रजेत त्याचा दरारा मोठा होता.
सध्याच्या काळात समांतर शरीरयष्टीचा म्हणून ब्रॉन स्टोव्हमन किंवा ग्रेट घाली ह्या कुस्तीगीर व्यक्तिरेखा आठवतात. त्याच्या समोर रे मिस्टीरिओचा खुजेपणा प्रकर्षाने दिसतो.



त्यांच्याशी सलोख्याने वागणे हाच पर्याय उरतो असा निष्कर्ष काढला तर तो चुकीचा नव्हता.

त्याची आधीच्या काळातील लष्करी कामगिरी प्रशंसनीय होती. त्याच्या हातात दिलेली प्रत्येक मोहीम त्याने फत्ते केली होती. १६५६ मधे कुतुबशाहला मदत म्हणून लढताना औरंगजेबाला त्याने कचाट्यात धरले होते.

पण मग वरून 'ऑर्डर' आल्यामुळे त्याचा नाईलाज झाला. बडी साहेबाच्या कानाशी लागून संतापून त्याने आपला राग व्यक्त केला होता. आपल्या सरसेनापती खान महंमदाची हत्या करायला मागे पुढे पाहिले नव्हते.

कोकणपट्टी, देशावरील जागिऱ्याचे मो(मु)कासे त्याचे होते. वाईचा *मुकासा त्याच्या नावाने गेली दहा वर्षे होता. दाभोळ बंदरात त्याच्या मालकीची मालवाहू तीन जहाजे होती. त्यामुळे त्याच्याकडे स्वतची साधन संपत्ती भरपूर होती. मुले, पुतणे, इतर नातलगांना त्याने जागोजागी आपली माणसे म्हणून नोकरदार केले होते. स्थानिक मराठीत त्याच्याशी संवाद साधला जात होता. तो कसा ते त्याच्या एका पत्रावरून समजायला मदत होते.

** चंद्रराव मोरेच्या जावळी संस्थानातील बखेडे सोडवायला १६४९ मधे एक पत्र मराठीत कान्होजी नाईक जेधेना पाठवले होते. "चंद्रराऊ कदीम(पुर्वीचा) मयत झाल्यावरी जावलियावरि (जावळी संस्थान) गैरलोकी (भलत्याच नातलग लोकांनी) पैस (घुसखोरी) करून बलकावले आहे. या बद्दल त्यावरी नामजादी (स्वारी) केली आहे."

जून ते ऑक्टोबर किनारपट्टीवर, सह्याद्रीच्या डोंगर दऱ्यात तुफान पावसाळी हवामान, तर मराठवाडयातील कोरडी भीषण गरमी, अवर्षणे वगैरे हवामानातील बदल त्याला अंगवळणी पडले होते. चिंचोळ्या घाटातून जाताना मालवाहू जनावरांची, सैनिकांची काय दैना होते हे अनुभवाने त्याला पुरेपूर माहित होते. कोणाला धाकाने, तर काहींना पैसे चारून आपल्याकडे वळवून घेण्यात तो हुशार होता. नद्यानाले, डोंगर घाट, चढउतार, आपल्याकडील कोट, गढ्या, तिथली व्यवस्था वगैरे सर्व बाबी लक्षात घेऊन मोहिमेची आखणी तो करत असे. अशा कसलेल्या, शूर, बलवान, धूर्त आणि क्रूर सरदारांची नेमणूक म्हणजे यशाची खात्री होती. विजापूरच्या दरबारात या मोहिमेची अधिकृत जबाबदारी विडा उचलून त्याने घेतली होती.

महाराजांच्या कानावर सतत पडावे म्हणून खानाच्या स्वभावानुसार हिंदू मंदिरे, धनवान व्यापारी, पेढ्या चालक, सराफांना त्रास देत राहणे, जे जहागीरदार त्याच्या बाजूने मान तुकवून तयार होत नव्हते त्याच्या मुंड्या मुरगाळून तयार केले जाणे चालू होते. वाट वाकडी करून तो स्वतःकिंवा आपल्या कर्तबगार सरदारांना दूर वरच्या मंदिरांची नासधूस, बाजारपेठा, करायला पाठवून रयतेला दहशतीत ठेवणे चालू होते.

सामान्य जनतेला छळून नाईलाजाने सैन्याला राहायला, खायला प्यायला सोय करायला भाग पाडले जात होते. परंपरेने चालत आलेल्या धार्मिक यात्रा, वाऱ्या यांच्यात खंड पाडून, मूर्तींचे पावित्र्य नष्ट करून गैरमुस्लिम धर्म किती तकलादू आणि कुचकामी आहेत हे मुद्दाम बिंबवले जावे या उद्देशाने तत्परता दाखवली जात होती.

...

*मराठीत मुकासा - जहागीरदार (मुकासा, मोकासा: लष्करांतील नोकरीची अट घालून त्या संबंधानें किंवा इनाम म्हणून दिलेलीं गावें, जमिनी वगैरे. २ गांवच्या वसुलामध्यें व अंमलामध्यें हिस्सा. ३ चौथाईपैकीं राजबाबती वजा करून राहिलेला भाग; **कोशार्थात अनुस्वारांची रेलचेल लक्षात येते.**)

** **संदर्भ - भाग १ पान ६५९ राजा श्री शिवछत्रपती गजानन भा मेहेंदळे**

मिपावरील अभिप्राय –

...पहिलवानांच्या फोटोतून चेहऱ्यावरील क्रूर भाव आणि उंचीतील तफावत यातून जाणवणारी महाराजांच्या विजयाची अशक्यता जाणवते. अशा हरलेल्या बाजीला महाराजांच्या धूर्त पवित्रे, दुर्दम्य साहस, समयसूचकता यातून कशी मात दिली ते वाचायला उत्सुक आहे.
...अगदी त्या काळात गेल्याचा भास होतोय.
तुमच्या लेखनात ताकत आहे.
... महाराजांचा इतिहास माहीत आहे पण एका नवीन दृष्टीकोनातून वाचायला उत्सुक आहे....

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग ३ शिवाजी महाराजांपुढील परिस्थिती - आव्हाने, संध्या

**शिवाजी महाराजांच्या पुढील परिस्थिती - आव्हाने आणि संध्या**

**भाग ३**

### बंधू संभाजीची हत्या

सन १६२८ पासून शाहजहान बऱ्हाणपुरहून, आग्र्याला व नंतर दिल्लीतून राज्य कारभार चालवत होता. शहाजीराजांचे सुटका करून देण्यासाठी सन १६४९ महाराजांनी किल्ले परत केले होते. शहाजीराजे बंगलोरला परतले. १६५३ साली महाराजांच्या मोठ्या भावाची - संभाजीची हत्या कर्नाटकात कनकगिरीला झाली. त्या हत्येत अफ़झलखानाचा हात होता. संभाजीराजेंनी कनकगिरी-हंपीच्या आसपासच्या वैभवपूर्ण वास्तू पाहून आपल्या राज्याची राजधानी करता येईल असा कयास बांधून अब्बारवान नामक तिथल्या किल्लेदाराला त्याच्या गचाळ आणि हिंदूंना छळणाऱ्याला कामगिरीमुळे काढून तिथे आपल्याकडील किल्लेदार नेमला. कागाळी आदिलशहाकडे गेली. त्याचा निवाडा करायला अफ़झलखानाला नेमले गेले. अफ़झलखानाला संभाजीराजेंनी पूर्वी बंगलोरच्या एका लढ्यात हुसकाऊन लावल्याचा राग होता. वरवर मदत करतो असे दारववून अब्बारवानाच्या बाजूने त्याने आपले सैन्य अचानक उभे केले आणि संभाजीराजेंना दगा करून मारले. भावाला असे मारलेले महाराजांच्या जिव्हारी लागले.



सध्याचे कनकगिरी

State Bank Of India

Kanakagiri

ಕನಕಗಿರಿ






(बंगलोर - हंपी - कोप्पळ - कनकगिरी नकाशा)




## शिवाजी महाराजांच्या पुढील परिस्थिती

प्राचीन काळापासून जहागिरदार हा एका लहान मोठ्या भागापुरता मुलुकी व्यवस्थापन करणारा राजाच असे. फरक असा होता की जहागिरीतील शेतीवाडीचा मुलुख त्याच्या ताब्यात असे. पण त्या भागातील किल्ले, गढ्या, जकात वसूली नाकी यावर याचा ताबा नसे! गडावरील गडकरी, बंदरावरील मालधक्का, जहाजांची वाहतूक यावर जहागीरदारांचे नियंत्रण नसे. त्यामुळे गडावरील मुखियाची मर्जी पण त्याला सांभाळावी लागत असे. चालू घटनाक्रमात, राजसत्तेतील शाह्यांच्या सत्ता संघर्षात त्यांना आपल्या निष्ठा बदलत्या ठेवाव्या लागत असत.

महाराजांच्या मते जहागीरदार आपण असूनही राजा, नबाब, शाह्या, यांच्या हातातील बाहुले बनून, त्यांच्या राजकारणातील समस्या, लहरी सांभाळून, परतंत्राने का वागावे? महाराजांची कुचंबणा ही होती की ज्या रयतेचा मुख्य कारभारी मी, त्या रयतेच्या समस्या समजून घेऊन, अवर्षण, अतिवृष्टी, जंगली जनावरांच्या धाडी, अन्य नैसर्गिक आपत्तीत रयतेच्या समस्यांसाठी तोंड द्यायचे मी, त्यांना शेती आणि अन्य उद्योगातून शांत सुखाने राहू देण्याची गरज असताना, विविध धार्मिक सण, प्रथा, यात्रांसाठी जमणाऱ्यांच्या रक्षणाची जबाबदारी माझ्या अंगावर असते. मात्र गडावरील सत्तेच्या राजकारणात होणाऱ्या बऱ्यावाईट घडामोडीत मला सामिल केले जात नाही. आदिलशाह, निजाम, कुतुबशाह, पोर्तुगीज किंवा मुगलांच्या सुभेदारांना आम्हा जहागिरदारांनी कधी धड पाहिले देखील नाही अशांच्या बाजूने आपल्या फौजा तैनात करून लढाईत का उतरायचे? त्यांच्या फौजा आपल्या मुलुखातून जात असताना त्यांची का बडदास्त ठेवायची? माझ्या मुलुखातील गड आणि किल्ले माझ्या अखत्यारीत असले पाहिजेत. त्याच्या आसपासच्या मार्गावरून होणारी जकात, मालगुजारी यावर माझी मालकी असली पाहिजे.

## शिवाजी महाराजांच्या पुढील आव्हाने

महाराजांच्या मते जहागीरदारीची प्रथा जुनी झाली होती. घराण्यातील कोणी एकाने साहसी कामे, लढाईत पराक्रम गाजवला म्हणून त्याच्या नंतरच्या पिढ्यांना वारसाहक्काने जहागीरदारांचे पद देण्याऐवजी केलेल्या कामगिरीचा मोबदला पैशाच्या रूपात दिल्याने ऐदी बनलेल्या जहागीरदारांना चाप बसेल, नव्याने तरूण, होतकरू, साहसी सैन्याची फळी उभी राहिल, यासाठी वेळेवर पगार, भत्ते, नवीन जनावरे, शस्त्रे यासाठी खेळते धन मिळवायला विविध परमुलुकातील श्रीमंत, व्यापारी हे त्यांचे लक्ष्य होते.

सलोख्याने अशा गोष्टी होत नाहीत म्हणून शिवाजी महाराजांनी एक एक गडावर आपली सत्ता स्थापन करायला सुरवात केली. शहाजीराजांच्या मुलगा म्हणून सुरवातीला दुर्लक्ष केले गेले. नंतर पुरंदर गडाचा कब्जा केल्यावर शहाजी राजांना पकडून शिवाजीला वठणीवर आणायची खेळी केली गेली. जेंव्हा महाराजांनी आपल्या जहागिरीच्या बाहेरच्या भागातील गडांवर, किनाऱ्यावर, कब्जा केला तेंव्हा ती जास्त गंभीर व तातडीची बाब झाली. या त्यांच्या विचारसरणीला आसपासच्या जाहगिरांची मान्यता मिळणे अशक्य होते. कारण त्यांनी असा विचारच केला नव्हता. महाराजांचे कोवळे वय असल्याने काही दिवसात हे भूत उतरेल असे काहींना वाटले. काहींच्या आपापसातील हेव्यादाव्यात शिवाजीची बाजू पकडून आत्ता मदत केली तर तो आपल्याला नंतर कामाला येईल असे वाटले. हळू हळू महाराजांचे तेजस्वी व्यक्तिमत्व, चारित्र्य, वैचारिक बैठक, प्रजेबद्दल असलेली कळकळ जाणवू लागली तेंव्हा अनेक सरदार वयाने व अनुभवाने ज्येष्ठ असूनही महाराजांना आव्हान न देता त्यांच्या बरोबर आनंदाने ते सामिल झाले. तुटपुंजी शस्त्र सामग्री, दुबळी अर्थ व्यवस्था बदलायची गरज होती. त्यांनी घोडेस्वारी करून वेगाने शत्रूच्या सामानावर, पैशाअडक्यावर घात करून मिळवायचा प्रयोग यशस्वी होत गेला. ती संपत्ती आपल्या चैनीसाठी न वापरता शस्त्र सज्जता, गड दुरुस्ती, प्रजेची देखभाल, उच्च जातीची जनावरे, यावर लावून आपल्या विचारांनी आचाराची जोड दिली.




छापेमारी करून बेसावध शत्रू सैन्यात भगदड करणे हे सूत्र त्यांनी वापरले. रात्रीच्या अंधारात अनेक कारवायातून वेगवान हालचाली करून धक्कातंत्राने अनेक प्रसंगात अदभूत यश मिळविले. ही तंत्रे शत्रू पक्षाला माहिती नव्हती असे नाही. पण त्यांचा गलथान कारभार, बेजबाबदार अधिकारी वर्ग, बोजड युद्ध साहित्य, जनानखाना वगैरे कारणांमुळे त्यांना महाराजांच्या सैन्यावर छापेमारी करायला अशक्य होत असे.

महाराजांनी काही महत्त्वाच्या नियमांची काटेकोरपणे अंमलबजावणी केली. कुठल्याही स्त्रियांच्या अब्रूला धक्का बसला नाही पाहिजे. धनिक व्यावसायिक आणि व्यापारी वर्गाकडून पैशाच्या स्वरूपात खंडणी वसूल करायची. शक्यतो त्याचा शारीरिक छळ न करता पुन्हा व्यवसाय करायला सोडून द्यायचे. अपराधांची गय केली जात नसे. गुन्हा सिद्ध झाला कि लगेच काही अवयव तोडून किंवा मारून टाकले जायचे. या उलट

केलेल्या पराक्रमाची नोंद घेऊन त्या व्यक्तीला लगेच कुवतीनुसार पैशांची बक्षिशी मिळत असे. गोपिनाथपंत बोकिलांना खानाला मारल्याच्या दुसऱ्या दिवशी सकाळी १ लाख होन बक्षीस देऊन गौरविण्यात आले. शिवाय अन्य साहसी सहभाग्यांचा पैसे देऊन विशेष सत्कार केला.

महाराजांच्या काळात मुगल सत्तेचा धर्म मुस्लिम होता. त्यामुळे त्या विरोधात जाऊन कामगिरी करताना धार्मिक कट्टरतेला टक्कर देण्यासाठी सदैव संघर्ष करावा लागला होता. मुस्लिम धर्मातील पंथाच्या आपापसातील मतभेदांचा पदर देखील महाराजांच्या वर्तनातून लक्षात येतो.

अफ़झलखानाची नेमणूक शिवाजी महाराजांना खलास करण्यासाठी करण्यात झाली असल्याच्या वार्ता हेरांकडून कानावर पडत होत्या. महाराजांच्या कार्याची कळकळ असलेल्यांनी काव्यमय निरोप पाठवून येत्या संकटाची चाहूल करून दिली.

## संकटातून संधीचा शोध

असे म्हणतात की सामान्य लोकांना भोवतालच्या परिस्थितीशी समेट करून नमते घ्यावे लागते. काहींना परिस्थितीशी जुळवून न घेता आल्यामुळे नामशेष व्हावे लागते. तर काही आपल्याला पूरक परिस्थिती हिमतीने निर्माण करतात. अशी लोकोत्तर व्यक्तिमत्वे महान म्हणून जगात मान्यता मिळवतात. आदिलशाहीतील कमकुवतपणा, मुगलांच्या आपापसातील हेवेदाव्यांना ऊत आला होता. भावाभावातील द्वेषभावनेने दिल्लीतील तख्तावर अधिकार मिळवायला लढाया सुरू होत्या. दोन सत्तांना खिळखिळे करायला हीच संधी आहे. हे महाराज जाणून होते.

अफ़झलखानाची नेमणूक झाल्यावर आपल्या सर्व सरदारांना एकत्र करून काय करावे यावर विचार विमर्श केला गेला. वेगवेगळी मते मांडली गेली. अफ़झलखानाचा पुर्व इतिहास पाहता त्यांच्याशी समझोता करणे हा शहाणपणाचा मार्ग आहे हे ठळकपणे समोर आले. आपल्याला अफ़झलखानाला टक्कर द्यावी लागेल. कारण तो फास आवळत एक एक महत्त्वाचे किल्ले, गढ्या, नाकी आपल्याकडे वळवत राहील. मग अगतिक होऊन समझोत्याच्या शर्ती कडक होत जाऊन विजापूरच्या दरबारात जीवंत जायची पाळी येईल. पुरंदर, सिंहगड, राजगड आणि आसपासच्या परिसरातील बळकट किल्ल्यातून, युद्धाच्या तयारीतून आपण किती दिवस टिकाव धरू शकू यावर विचार केला गेला.

एप्रिलमधे निघालेला अफ़झलखानाचा ताफा पुरंदरच्या आसपास यायला किती दिवस लागतात यावरून येऊ घातलेल्या पावसाळी मोसमाचा फायदा कसा करता येईल यावर चर्चा झाली. वेळोवेळी निर्णय काय घ्यायचे ते अफ़झलखानाच्या सैन्य हालचालींवर लक्ष ठेवून बातम्या काढायला हेरांच्या ताफ्याची विशेष नेमणूक करण्यात आली.

महाराजांनी आपल्या अंतस्थ मंडळाला खानाच्या बाजूने वश होण्याची शक्यता असलेल्या जागीरदार, सरदारांची यादी तयार करून त्यांच्या कडील सैन्य, शस्त्रे, जनावरे यांचा आढावा घेतला. सध्या आपल्या बाजूने असलेल्यांचा कल काय आहे. ते चाचपायला मध्यस्थ पाठवले.

**महाराजांनी अफ़झलखानाच्या संकटाबाबत आपले ध्येय काय आहे यावर चर्चेत मत मांडले.**

१. कुठल्याही परिस्थितीत आपण मैदानी लढाईच्या फासात अडकायचे नाही.

२. खानाच्या एकत्रित सैन्यबळाला सामोरे न जाता छोट्या तुकड्यात घेरून मोहिमेचा पसारा दूरपर्यंत वाढवण्याची शक्यता तयार करायची.

२. खानाशी टक्कर टाळायची असेल तर कोकणात सटकून जायला सोईस्कर घाट रस्ता असला पाहिजे.

३. खानाला कोकणात उतरायला मनाई करायला सैन्य रचना तयार पाहिजे.

४. निजामाच्या सत्तावाटण्यातील मुगलांच्या ताब्यातील कोकणातील मिळवलेले गड, बंदरावरील नाकी सुरक्षित केली पाहिजेत.
४. व्यापारी वखारी, नौका, परदेशाशी व्यापार थांबता कामा नये. संपत्तीचे निर्माण करणाऱ्या जहाजांच्या दळणवळणाच्या व्यवस्थेला धक्का लागता कामा नये.
५. अफ़झलखानाची ही गड किल्ले काबीज करायची मोहीम संपली तरी आपण कोकणातील पट्ट्यातून राज्य कारभार चालवत राहिला पाहिजे.
आपली संपत्ती, वैभव, दरारा आणि वैयक्तिक शरीर सौष्ठव यावर दक्ष खान मजल दरमजल करत येत राहिला. तिकडे महाराजांच्या खलबतातून परिस्थितीचा आढावा घेत वेगवेगळ्या पर्यायांची चाचपणी होत राहिली.

पुढे चालू...

**मिपावरील अभिप्राय**

...जहागिरदारीच्या मर्यादा प्रथमच कळल्या.
... खूपच सुंदर आणि माहितीपूर्ण लिखाण ! मुख्य घटनेची छान पार्श्वभूमी तयार होते आहे.
... अजून अफजल खान निघाला नाही विजापुरहून! मग तो पोचणार कधी?... लवकर लिहा
... काम वेळखाऊ आहे...
शिवाय येत्या एका भागाचे शीर्षकच आहे "खानाची सुस्त अजगरनीती!"

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग ४ अफ़झलखान निघाला विजापुरहून

**अफ़झलखान निघाला विजापुरहून**

**भाग ४**




### विडा उचलला

बडी साहेबीणनी अफ़झलखानाला विजापूरच्या राजवाड्यात खलबतखान्यात बोलावून घेतले. "आम्ही तुमची शिवाच्या बंदोबस्ताच्या मोहिमेवर नेमणूक करत आहोत. आपल्याला कोण हवे ते सरदार, जनावरे, पैसा अडका, वगैरेवर विचार करून खर्चाचा अहवाल सादर करा. तो आम्ही मंजूर करू. बशर्ते सिवा जिंदा दरबारमधे घेऊन या. किंवा त्याची लाश आमच्या हवाले करा. कामाला लागा." असा आदेश दिला. "मला सरदारांशी बोलून कारवाईचा आराखडा मंजूर करायला वेळ द्यावा." त्या प्रमाणे सर्व तयारी झाल्यावर दरबारात अफ़झलखानानाने विडा उचलून मोहिमेची जबाबदारी स्वीकारली. सैनिकी आवेशात, "हे काम मला दिलेत म्हणजे फत्ते झाले आहे असे समजा" असे हात वर करून आश्वासन दिले.

अफ़झलखानाची स्वतची सेना मे शेवटच्या आठवड्यात म्हणजे सन १६५९ च्या तारीख २५ सुमारास विजापूरहून निघायला *८ किमी दूर तोरवीला सज्ज झाली. नंतर जागोजागी किल्लेदार, सरदार आणि त्यांच्या सैन्याला समावेत घेत विजापूरहून (विजयापुरा)निघाली.
जेंव्हा निघाली तेंव्हा ती **१० हजार घोडदळ होते व त्या समावेत खानपानसेवा, तंबू, डेरे वाहक, जनावरांच्या देखरेखीचे नोकरवर्ग, किरकोळ सामान, कापड, दागिने व्यापारी, बाजार बुणगे ***अंदाजे १५ हजार होते. वाटेत मिळालेल्या सैन्यात पायदळ प्रामुख्याने होते.

++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++++
+++++
*राजधानीत सैन्याला असे मोठ्या संख्येने संचलन करायला मनाई असते. कदाचित बंड करून सत्ता काबीज करायचा प्रयत्न केला जाऊ शकतो. म्हणून राजधानीबाहेर मोकळ्या जागेत सैन्याला एकत्र जमवून वाजत गाजत जायचा संकेत असतो. आठवत असेल, इजिप्तमधे कैरो राजधानीत संचलनाच्या बहाण्याने अन्वर सादात यांची हत्या करण्यात आली होती.
** याला टीथ टू टेल रेशो मधून पहावे लागेल. हवाईदलात एका विमानाच्या सॉर्टीला पूर्ण करायला २० जणांचे हात असतात. असे मानतात.
*** अशा संख्या गणिताच्या भाषेतून न मानता ढोबळ मानाने पहाव्या लागतात. सध्याही एखाद्या फ्लाईंग स्क्वाड्रनच्या विमानांची संख्या त्यातील मेनटेन्ससाठी, मिशनमधे दुसऱ्या एयरफिल्डवर तैनात केलेल्या, वगैरे वगळता कमी न मोजता केली जाते. तसेच सुट्ट्या, आजारी रजा, नवे कोर्सेस करायला गेलेले हे वगळता मनुष्यबळ कमी जास्त होत राहते.

## विजापुर ते पंढरपूर मार्ग



तिथे वेगवेगळ्या सरदारांच्या सैन्याचे जथ्थे एकामागोमाग एक लावले गेले. मूसाखान, अंबरखान, याकूतखान, हसनखान वगैरे पठाण गटातील बड्या सरदारांचे हत्ती, उंट आपापल्या सैन्याच्या निशाणांच्या रंगीत पताकाधारींच्या मागे होते, यांच्या पाठोपाठ अफ़झलखानाचे खासे पथक खानाच्या शानदार हत्तीच्या मागे मागे लगटून होते. नंतर (Sr) रणदौलाखानचा मुलगा (धाकटा Jr) रहमतखान उर्फ रुस्तम ई ज़मान हे दख्खन (शिया) गटाचे, सिद्दी हिलाल व अन्य सिद्दी गुलाम गटाचे सैन्य लावले होते. मराठा गटातील नाईक पांढरे, नाईक घोरपडे, खराडे, मंबाजी भोसले, कल्याणजी जाधव, काटे, घाडगे सरदारांची फौज भाषेच्या गरजेचे प्रमाणे पुढे मागे होत राहिली. सगळे रस्तारुंदी प्रमाणे घोळक्याने जात होते. लष्करी परेडची शिस्त, आखीवपणा नव्हता. कोणाही सैनिकाला ठराविक असा पोषाख नव्हता. जो तो आपल्या घरच्या मळखाऊ कपड्यात हजर असे. डोक्याला मात्र प्रत्येकाच्या काहीना काही बांधलेले असे. त्यावरून तो उझबेगी आहे का इराणी किंवा तुर्क का पश्तूनी कबिल्यांचा आहे ते साधारण कळून येत असे. यासर्वांना ‘पठाण’ म्हणून सरसकट म्हटले जात असे. पण त्यांची आपापसात भांडणे, मारामाऱ्या होत तेंव्हा ते शिव्या देताना आपण ‘खास’ कोणत्या कबिल्याचे ते कळून येई! दोन मराठे सैन्य सामोरे आले तर ज्याच्या बाजूने जो लढतो आहे त्याच्या नावाने पुकाराकरून शत्रू का मित्र हे ठरवावे लागे.

विजापूरहून निघताना पंढरपूरपर्यंत जाता जाता आपल्यातील कडव्या सरदारांनी ठरलेल्या मार्गातून दूरच्या बाजारपेठा, मंदिरे, नदीच्या काठावरील सधन गावे, कसबे, यावर हल्ला करून नासधूस करून मंदिरातील, पेठांतील संपत्ती हस्तगत करावी असे आदेश होते. मुस्लिम धर्मातील कलमे न आचरणाऱ्यांवर धाक दाखवून त्यांच्याकडील वास्तू, मूर्तींना विद्रूप करून दगडात देव (अल्ला) नसतो. असे बिंबवण्याचा प्रयत्न करत पुढे जायचे असे ठरले होते. अफ़झलखानाला पूजास्थानांची, मंदिरांची नासधूस करण्यात इतका रस असता तर त्याने फक्त त्यासाठी वेगळी मोहीम करून तसे जास्त प्रभावीपणे केले असते. पण आपण भरपूर सेनेसह आदिलशाहाच्या हुकुमाने कामगिरीवर निघालो आहोत हे गावोगावी कळवायला हा सोपा जाहिरात करायचा सैनिकी राजकारणाचा डाव होता.

## मंगळवेढ्याहून सैन्य पाठवून सोलापूर, तुळजापूरला लुटले.




पंढरपूरच्या वाटेवर अफज़लखानाने मंगळवेढ्याला तळ पडल्यावर आधी ठरल्याप्रमाणे काही कडव्या पठाण सरदारांना तुळजापुरला जायची आज्ञा केली. त्यांनी वाटेत संदलापुरला (सोलापूर) किल्यातून रसद मिळवली. सिद्धेश्वराच्या मठात धुमाकूळ घातला व ते पुढे निघाले. तुळजापूरच्या बाजार पेठेत सैनिकांना नासधूस केली. भवानी मंदिराची व मुख्य मुर्तीची विटंबना करत मंदिर परिसरातील व्यावसायिकांना, पुजारी - भोपे यांना सतावून, धन वसूली करून ते पंढरपूरला खानाच्या ताफ्यात सामिल झाले. या दहशतीची बातमी ‘सिवा’च्या कानावर पोहोचेल अशासाठी काही मराठा हलकाऱ्यांना ढोल, तुताऱ्यांसह गावा-गावातून जाताना दहशतीचे वातावरण तापवायला पाठवून दिले.

अफ़झलखानाचा फौजफाटा विजापुरहून १४० किमी पार करून पंढरपुराला पडावाला आला. त्याने आपल्या देखरेखीत विठ्ठल मंदिराचा ताबा घेतला. व्यापारी, गाभाऱ्यातील पुजारी - बडवे, उत्पात यांच्या कडून छबीन्याच्या चाव्या घेऊन ते साफ केले गेले, सराफ, अन्य धनिकांकडून बऱ्याबोलाने वसूली केली. मंदिराची मुख्य मुर्ती हाती न लागल्याने काहींना जिवे मारून व धमकावून शोधायचा प्रयत्न केला. त्याचे सैनिकी ध्येय लढाईचे असल्याने तुळजापूरहून सरदार लूट घेऊन सुखरूप परत येत असल्याची बातमी ऐकून त्याचा पुढचा टप्पा सुरु झाला.

# पंढरपूर ते वाई सरळमार्गाने २९२ किमी




तोपर्यंतच्या हेरांकडून काढलेल्या बातम्यावरून सिवा कुठे लपायचा प्रयत्न करेल यावर मधून मधून आपल्या बरोबरच्या सरदारांशी मसलत करून होता. माळशिरस, फलटण, लोणंद जेजुरी, सासवड मार्गे पुरंदर किल्ल्याला जायची वाट कमी चढउतारांची, सोपी होती. असे या भागातून आधीच्या लढ्यात भाग घेतलेल्यांचे मत पडले. साधारणतःदररोज १० किमी (नेहमीपेक्षा जास्त) वेगाने १० ते १२ जून पर्यंत पंढरपुरानंतरचे अंतर कापत सैन्य जत्था जात होता. त्यातील टेहळणी पथक सुरक्षिततेचा आढावा खानाला सादर करत होते. वाटेत लागणाऱ्या गढ्यांतील शेतसाऱ्यातून मिळालेले धान्य, वैरण वापरून सैनेच्या खाण्याची सोय लावली जात होती. घोडे, उंट, बैल यांना चरायला सोडले जाई तर हत्तीसाठी गवताचे भारेच्याभारे, कणकेचे जाड जाड रोट खायला तयार करायला खानसाम्यांना जुंपले होते. आसपासचे गाव-पाटील, कुलकर्णी आपापली हजेरी लावून त्यांच्या तैनातीतील बारगीरांची वर्णी खानाच्या सैन्यात लावायला पुढाकार घेऊन होते. हळू हळू सेनेचा आकार फुगत राहिला.

# मसलती आणि मनसुबे

हे

हेरांच्या बातम्यानुसार पुरंदरच्या आसपास सैन्याची जमवाजमव होत नसून तिथले सैन्य हलवून राजगडाकडे जात आहे. पावसाळ्यात जंगलातील किल्ल्यात लपून राहायला सिवा ठरवत असावा. खानाच्या अनुभवानुसार सिंहगड किंवा राजगड, तोरणा यापेक्षा जास्त सिवा प्रतापगडाला सटकायची शक्यता जास्त आहे. असे विचारांती ठरले आणि मार्ग बदलून म्हसवड, दहिवडीच्या वाटेने सैन्य पुढे जाऊ लागले.

जंगलातील किल्ल्यावर जायला लागले तर वाईच्या आपल्या परगण्यात पावसाळ्यात राहायची सोय करायला बरे पडेल. शिवाय (बत्तीस)शिराळे मुकासा आपल्या ताब्यात आहे. तिथले सैन्य आपल्या कामाला येईल. आदिलशाहीकडून नेमलेल्या पन्हाळ्याच्या किल्लेदारावर जरब बसवून आपला पित्त्या किल्लेदाराला नेमून आपल्या मुलांना पुढेमागे तिथे नेमून नवी राजधानी करायला शक्य होईल असा त्याचा विचार होता. आपल्या माहितीतील बरेच हाताखालचे वाईतील हुशार, अनुभवी रहिवासी, अन्य लोक मदतीला असतील. सिवाला वाटाघाटीला बोलावण्यातून पुढील चाल ठरवायला सोईचे होईल. सिवाला पकडून नाहीतर मारून त्याचे प्रेत आदिलशाहच्या दरबारात पाठवले की अंबेनळीच्या घाटातून पोलादपूरला कोकणात उतरून चौलचा (मुर्तजाबाद)आपला मुकासा मधल्या मुलाच्या ताब्यात राहील. बडा बेटा फाज़लखानाला दाभोळच्या बंदराला असलेली आपली जहाजे व इलाखा सुपूर्त करून निजामशाहीतील सिवाने लाटलेले कल्याणचा (मुरंजन) मामला, भिवंडीचा (इस्लामाबाद) मुकासा गढ्या, किल्ले आपल्या सरदारांकडून ताब्यात घेतले जातील. फिरंगींना कामाला लावून नवी जहाजे, गुराब यांचे पलटन तयार करून आपला दबदबा इतका तयार होईल की त्या नंतर पुढच्या ६ महिन्यात अली अदिलशाहला उडवून आपल्याला विजापुरात बस्तान बसवता येईल. औरंगजेबाविरुद्ध आग्र्यात बंदी शहाजहानने पुन्हा लढाई सुरु केली तर त्याची बाजू घेऊन आपले मुगलांशी संबंध सलोख्याचे राहतील.

**खानाला पुढचे मनसुबे फक्त मनरंजन न राहता सत्यात उतरवायची शक्यता होताना दिसत होती.**

त्याच्या मते सिवाने आपणहून एका गडावर लपून राहून चूक केली. वाईच्या पर्यंत येताना त्याने आपल्या सैन्याच्या जत्थावर वारंवार हमले करायचे सोडून दिल्याने त्याच्या बाजूच्या सरदाराचे मनोधैर्य खचून ते आपल्याकडे यायला उत्सुक होतील. पावसाचा जोर कमी झाला की देशावरील सिरवळ कोट मुकासा, बारामती मुकासा, इंदापूरचा कोट, चाकन किल्ला, लोहगड, जुन्नर, संगमनेर पर्यंत आपले सैन्य पाठवून सिवाला तिकडे जायला शक्य होणार नाही. फार करून सिवा सैन्यासह कोकणात पळून जाईल. दंडाराजापुरीचा सिद्दीमुळे त्याला कोकणातील पट्टीत खालून वरून दाबुन मारता येईल. इतके कष्ट करण्यापेक्षा सिवाला ‘तुला तुझ्या बापाने दिलेल्या मुलुखापेक्षा जास्त मुलुख ‘मुगल शहाजहानशी वाटाघाटीत देऊ असे गोडीगुलाबीने पटवून, एकटा पाडून त्याना खतम करायची संधी यावी यासाठी तो उत्सुकतेने ही मोहीम पावसाळ्यानंतर संपायची वाट पहात होता.

## वाटेतील निंबाळकराला चेचले




म्हसवडपाशी खानाने शंभू महादेवाच्या डोंगर शिखरावरच्या देवस्थानला वाट वाकडी करून जायला आपल्या तिखट सरदारांना सैन्य देऊन पाठवले. तो स्वतःदहिवडीला पोहोचून तिथून मलवडीला गेला. तिथे त्याने सिवाच्या जवळच्या नातेवाईकांना त्रास देऊन त्यांना आपल्याकडे ओढायचे तंत्र वापरले गेले.

बजाजी नाईक निंबाळकरांची बहीण, संभाजी महाराजांची आई, सईबाई महाराजांची पत्नी होती. आदिलशाहीतील शहाजी राजेंच्या बरोबर असलेल्या घरोब्यातून सोयरिक केली होती. शहाजीराजांच्याशी वैयक्तिक वैरामुळे एका दगडात दोन पक्षी या न्यायाने, फलटणहून अपमानास्पद वागवत मलवडीला खानाच्या डेऱ्यात त्यांना नेऊन उभे केले. 'बजाजी नाईक, तू आतून सिवाला मदत करतोस? ''खरे सांग, नाहीतर तुला हत्तीच्या पायी देतो!' 'तू शपथ वाहा, की तू आमच्या बाजूने आहेस? नाहीतर तुझा सुन्ता करून मुसलमान करीन' ! खानाच्या सैन्यात इतके मराठा सरदार असले तरी फक्त बजाजी नाईक निंबाळकरांवर अशी आफत का यावी? राजकीय डावपेच म्हणून बजाजीला मोहरा बनवून सिवाला डिवचून ठेवून त्याचे भविष्यात देखील असेच होईल असे मनात भरवून देण्यात आले. बंगलोरला बसलेल्या शहाजी राजांना मुलाच्या मदतीला आला तर तुम्हाला, तुमचे जवळचे नातेवाईक आणि मित्र परिवाराला नामशेष करून टाकले जाईल असाही तो संदेश होता.

मळवडीला बजाजी नाईक निंबाळकरांवर आफत खानाच्या डेऱ्यात आली

वर्धनगड किल्लेदारावर आफत

महाराजांच्या शिंगणापूर दैवतावर वाटवाकडी करून हल्ला

खटावकरांचा भोचका पाहणाचार

निढळवरून जाताना खटाव सारख्या आडगावातील किल्ल्यात आपण यावे यासाठी तिथले पाटील, चौगुले, कुलकर्णी प्रयत्न केले होते, तिथे कोटात मुकासदार म्हणून खानाचा सत्कार करण्यात आला. सैन्य बंदोबस्तात दिले गेले. सिवाच्या बंदोबस्तानंतर अफ़झलखान सर्वेसर्वा होणार हे धडधडीत दिसत असल्याने वाटेतले सराफ, धनिक विक्रेते, मंदिरातले पंडित पुजारी, आसपासहून मुद्दाम येउन आपल्याकडून आम्ही आहोत हे दाखवण्यासाठी धडपडत होते. जो जिंकेल त्याच्या बाजूने जयजयकार करणारे नोकरदार आपल्या निष्ठांना बदलत्या ठेऊन जीवनयापन करत होते. औंधच्या यमाईच्या डोंगरावरून दिसणाऱ्या दूरवरच्या प्रदेशावर नजर टाकून खान आपल्या मनासारखे चालले आहे. यात समाधानी होता.

डोंगरांच्या कुशीत, शिखरावर चढून हे काफिर लोक गोल दगडावर पाणी घालून, जेजुरी, यमाई, भवानी, सारख्या देवळात जाऊन जाऊन मी मरायसाठी का मन्नत मानतात हे त्याला पडलेले कोडे होते!

औंध (सातारा) यमाई मंदिराच्या टोकावरून दिसणारा दरवरचा प्रदेश

वर्धनगडावर गडकऱ्याने खानाची भोजनाची बडदास्त सन्मानाने केली नाही हे त्याने लक्षात ठेवून आपल्या वाकनवीसाला, 'सांगा त्याला, आम्ही खूष नाही झालोय. पुन्हा इकडे जाणे होईल तेंव्हा कुचराई महागात पडेल!' असा दम द्यायला आज्ञा केली.

जेंव्हा उच्चपदाची नशा चढते तेंव्हा अहंकार फुगत जातो. सगळे तुच्छ वाटायला लागतात. इतरांच्या सल्ल्याची गरज वाटत नाही. एक सोपस्कार म्हणून सरदारांशी मसलत करायला लागते. पण शेवटी मी ठरवीन तेच होईल अशी मानसिकता होते. महान व्यक्तींना याच रोगाची लागण होते मग त्यांना मृत्यू शिवाय पर्याय नसतो!

## अफ़झलखान आपल्या सैनेच्या जत्थासह पोहोचला वाईला

जून महिन्यापासून पावसाचे ढगाळ वातावरण सगळीकडे पसरले होते. खानाने आपल्या सैन्यातील सरदारांना आपापले तंबू, जनावरे यांना घेऊन कोरेगावपासून पुढे पुढे जायला आज्ञा केली होती. भाकरवाडी, शिवथर, मर्ढे, पाचवड करत ते वाईच्या कृष्णा नदीच्या पात्राला मिळणाऱ्या ओढ्याच्या मागील जागेत पुर्वीपासूनच्या तयार गढीच्या आसऱ्याने तळ ठोकून राहायला लागले.

खानाच्याकडील छप्परबंद नोकरचाकरांनी खानाच्या शानदार राहण्याची सोय लागेपर्यंत खानाने रहिमतपुरात आपल्या मित्राच्या कोटात राहायला पसंत केले.

बड्या रणदुल्लाखानाला अफ़झलखान मानत असे. त्याच्या पश्चात वाईचा मुकासा (जहागीरदारी) अफ़झलखानाला मिळाला होता. जरी खान वाईला रहात नसला तरी त्याचे लक्ष सदैव वाईच्या राजकारणात असे. जावलीचा चंद्रराव मोरेवर त्याचा वरदहस्त होता. खोपडे भावातील भांडण सोडवण्यासाठी स्थानिकांना मध्यस्ती करायला लावून खोपडेला सिवाकडे जायला नको म्हणून प्रयत्न केले होते. मरहूम रणदुल्लाखानाचा मुलगा धाकटा रुस्तुम ई जहान उर्फ रहिमतखानाने बापाच्या नावाने कबर बनवल्यावर आधीच्या कुमठे(बु.) गावाचे नाव रहिमतपुर झाले. वाईला अफ़झलखान येत आहे म्हटल्यावर त्याच्याकडून गढीतील नोकरवर्ग दिमतीला दिला गेला. खावे, प्यावे, कला अदाकारांशी मौज मजा करत त्याचा श्रम परिहार केला जात होता. खानाला आपले नाव गावाला द्यायची हौस आहे हे जाणून रहमत खानाने चापलुसीची खेळी केली.

रहिमतपूरला 'अफ़झलपूर' असे नवे नाव दिल्याचे घोषित केले. आदिलशाहच्या दरबाराकडून संमतीचा दर्शक सही सिक्क्याचा आदेश येण्यासाठी एक हलकारा पाठवला. खानाचे प्रस्थ वाढत आहे. त्याचा आपल्या गादीवर डोळा असू शकतो असा संदेशही गेला. वाईचा कोट सज्ज झाल्यावर खान रहिमतखानाला व



त्याच्या सैन्याबरोबर घेऊन कोरेगाव-पाचवड करत वाईला १६५९ जुलैच्या १० तारखेपर्यंत पोहचला.

पावसाची रिपरिप, कृष्णा नदीच्या पात्रात आलेल्या पुराच्या पाण्याकडे पहात तो चुटक्या वाजवत काहीतरी धोरण आखत होता.



**नकाशावर प्रत्यक्षात वाईचा कोट आणि गढीचा भाग सध्याच्या संदर्भात असा दिसतो.**

सिवा प्रताप गडावर आल्याच्या बातम्या ऐकून त्याने वाई गावातील अनुभवी कृष्णाजी भास्कर कुलकर्णींना बोलावून त्यांच्यावर कितपत विश्वास दाखवावा यांचा विचार विमर्ष आपल्या सरदारात केला. आणि पावसाळा संपायच्या आधी सिवाशी सामोपचाराने काय बोलावे? अटी काय लादाव्यात? कुठे भेटायला बोलवावे? कृष्णाजी भास्करवर सतत लक्ष ठेवायला कोणाला बरोबर जाऊ द्यावे? वगैरे चर्चा सुरू केली.

**{अधिक माहिती - *साधारणपणे घोड्याला ६ किलो गवत व ६ किलो इतर अन्न धान्य लागते तर माणसाला एक किलो अन्न लागते असा ढोबळ अंदाज बांधला तर १० हजार सैन्यास एक घोडेस्वार असतील असे धरले तर ७० मेट्रिक टन धान्य रोज लागेल. शिवाय हत्ती, उंट बैल इतर प्राणी व फौजेतले बाजारबुणगे पाहता अशा फौजेची धान्याची गरज दररोजची १०० मेट्रिक टन होत असावी. याशिवाय गवत वेगळेच! असे ३० हजारापेक्षा जास्त सैन्य आणि अवांतर नोकरचाकरांची संख्या असेल तर कितीच्या काय गणित जाईल?**

**संदर्भ - गजानन मेहेंदळे लिखित श्री राजा शिवछत्रपती भाग १ पान ४०३.}**

पुढे चालू...

**मिपावरील अभिप्राय**

... त्याच्या (अफझ़लखानाच्या) मते सिवाने आपणहून एका गडावर लपून राहून चूक केली. वाईच्या पर्यंत येताना त्याने आपल्या सैन्याच्या जत्थावर वारंवार हमले करायचे सोडून दिल्याने त्याच्या बाजूच्या सरदाराचे मनोधैर्य खचून ते आपल्याकडे यायला उत्सुक होतील...

ओक सरांचे काय विचार आहेत?

... आपले निरीक्षण योग्य...

16 Mar 2020 - 7:41 am | *शशिकांत ओक*

सिवाला उकसावून, भडकवून मैदानी प्रदेशात लढायला लावायचे हे खानाच्या बाजूने मांडलेल्या पटाचे उत्तर होते. त्याच्या बाजूने लढणाऱ्या मराठा सरदारांना त्याने या करता लवचिक धोरणाने पुढे - मागे ठेवले होते. की वेळ आली तर ते सिवाशी लढतील. बरोबर नेलेल्या तोफा, गोळे यांच्या मारण्याच्या कक्षेत त्यांना फिरते ठेवून सिवाची सैन्य शक्ति क्षीण करायची.

महाराजांच्या धोरणाची आखणीत बचावात्मक पवित्रा होता. पहाडी प्रदेश, ना माहिती रस्ते, चिंचोळ्या वाटा यातून सैन्यातील गुणात्मक संख्या बळ घटवायचे असेल आणि तर खिंडीतील वाटा उपयोग पडतात.

सिवा एका कोपऱ्यातील कोटात बसल्यावर आता शोधायला कुठे जायला नको हे बरोबर वाटत असले तरी सिवाने त्याच्या सोईच्या जागी ओढून कळत नकळत खानाला जाळ्यात ओढले. खानाच्या अनुभवानुसार तो यातून मात करायला समर्थ होता. शिवाय काम खानावर सोपवले होते. त्याला धोका पत्करून जाणे भाग होते.

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग ५ सुस्त अजगरनीती

### सुस्त अजगरनीती

### भाग ५




शान आणि वैभवाचे प्रतीक, वेळोवेळी बोजड सामान घेऊन जाणाऱ्या हत्तींनी पावसाळ्याचा मौसम, नदीच्या पाण्यात डुंबायचा मस्तीचा शौक़ पुरा करून घेत होते. हत्तिणींशी संग करायला हत्ती चेकाळत होते. त्यांना लांब ठेवायला माहूतांची तारांबळ होत होती. उंटांचे तांडे, गाई - बैल पावसाळ्यात आडोशाने रवंथ करत संथ होते. जंगली जनावरे फेकलेले उष्टे अन्न खायच्या नादाने तळाजवळ सारखे भिरभिरत असत. त्यांना मारून पुलाव्यात त्यांचे शिजलेले तुकडे घालून खायला अनेकांची मेजवानी होई.

नालबंद कारागीर घोड्याच्या खुरांना नवे नाल मारून आपली कमाई करत होते. लोहारांच्या भट्ट्यात भर पावसात पेटवल्या जाऊन नवे नाल, खिळे बनत राहिले. मुस्लिम सरदारांच्या दाढ्यांना आकर्षण रंगीत करून मिशा साफ करणे यावर नाई लोकांना उसंत मिळेना! तलवारींच्या ढिल्या मुठी, बाजूबंद दुरुस्त करून घेणे, आपापल्या शस्त्रांना धार लावायला नोकर वर्गांना जारीने कामाला लावले गेले. मराठ्यांच्या चपळ आणि जंगलातून साहसी कारवाया करणाऱ्या सैनिकांना शह देण्यासाठी सुस्त, बेशिस्त, घनदाट अरण्यात गांगरुन जाणाऱ्या कुचकामी नोकरांना, सरदारांच्या जनान्याला वाईच्या तळावर मागे ठेवून दिले गेले.

कृष्णाजी भास्कर आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी वाटाघाटीत सिवाला गुंतवून डोंगराळ जंगलातून कुठवर बाहेर काढता येईल यावर वरचे वर खल होत राहिले.

सरदारांच्या मते यापुढे तीव्र खडे चढ - उतार, जंगलातून, जायला लागेल. ते जाता येईल पण तिथे लढाईची वेळ आली तर आपल्या सैनिकांना एकत्र ठेवणे शक्य होणार नाही. घनदाट जंगलात बिना वाटाड्यांच्या, वाट चुकलेल्या सैन्याला आपल्या सरदारांच्या पुढच्या आज्ञा काय आहेत हे कळले नाही तर ते आपला जीव वाचवायला पळापळ करतील. एवढा केलेला आाटापिटा वाया जाईल. म्हणून खानाने कुठल्याही परिस्थितीत जंगलात शिरायची अट मानली नाही पाहिजे. सिवाकडून आलेल्या वकिलाची लाचारी खानाच्या शरीरयष्टीकडे पाहून वाढली. 'कुठे धिप्पाड तुम्ही! कुठे ते सिवा! असे सारखे म्हटलेले ऐकून ते वरवर खानाला खूष करत आहेत हे बाकीच्या सरदारांना कळत होते. अशाने भरीला पडून खान आपण ठरवलेल्या अटीत का माघार घेतो याचे आश्चर्य व चीड वाटत होती.

अफ़झलखानाला अशा सरदारांना नाराज होताना पाहून त्यांची काळजी वाटत होती. भयंकर जंगलातील ओळखायला न येणारे रस्ते, वाटा, उंच उभ्या चढणीचे सुळके आपल्याकडील सराव नसलेल्या सैनिकांना चढायला फार कष्ट पडतील हे तो जाणून होता. पण त्याच्या मनात दुसरे आडाखे होते. आता सिवा तर काय आपल्या तावडीतून सुटणार नाही. त्यानंतर या कोकण वाटेने त्याला आपल्या सेनेला बरोबर घेऊन समुद्रकिनाऱ्यावरील भागात जायचे आहेच.

सरदार पण नाराज होणार नाहीत आणि पुढील नियोजनासाठी उपयोगी पडतील असे जंगलात फिरणारे, वाटाडे म्हणून कामाला येणारे, कुठल्याही अवघड वाटेतून लीलया पार करणारे प्रवीण काटक स्थानिक तरुणांना त्याने धडाधड भरती करायला सुरवात केली. जंगलात शिकारीला वापरायचे आपले तिरकमठे, भाले, गोफणी, दोरशिड्या, आदि साधने घेऊन आसपासच्या खेड्यातील तरूण नव्या नोकरीत संधी शोधत होते. अवजड सामान उचलायची कामे करायला अनेक लहान मोठे लोक लगेच तयार झाले. जावळीतील खडानखडा माहिती असलेले वाटाडे, चपळाईने चढउतार करायला सरावलेले तरूण भरती केलेले पाहून नाराज सरदारांना खानाच्या सेनापती पदाचा विश्वास वाढला.



सिवाच्या विरूद्ध लढायला आपल्या बाजूने सध्या तयार असलेल्या सरदारांची ते आपल्या बाजूने लढतील अशी शाश्वती नव्हती! मंबाजी भोसला सहाजीचा चुलत काका आपल्याकडे तर चुलत भाई बाबा भोसला सिवा कडे! गुंजण मावळचा शिळीमकर अर्धा आपल्याकडून तर त्याचे काही किल्लेदार सिवाकडे! म्हसवडचा रतनजी माने, मलवडीचा मालजी पांढरे, ढोणे, जाधवराव दौलताबादकर वगैरे मंडळी राग रंग पाहून केंव्हाही आपली पगडी फिरवून आपल्याला पेचात पाडतील अशी त्याला शंका होती! वाटाघाटींच्या बातम्या यांच्या मार्फत सिवाकडे जायची शक्यता जाणून वाटाघाटींच्या सभेच्या जागी त्यांना यायची बंदी केली. यावर आणखी उपाय म्हणून त्याने सिवाच्या मुलुखातील सुप्यावर कल्याणजी जाधवाला, शिरवळकडे नाईक पांढरे याला, सासवडवर नाईकजी खराडे या मुख्य सरदारांना आपल्या पठाण सरदारांच्या अखत्यारीत पावसाळ्याचा जोर कमी झाल्यावर सप्टेंबरमधे मोहिमेवर धाडले. सिद्दी हिलाल हा मराठ्यांच्या घरी गुलाम म्हणून वाढलेला असल्याने त्यालाही खानाने हवेली पुणे मावळात धाडले. जंजिऱ्याच्या सिद्दी सैफखानाला कळवून तळकोकणात किल्ल्यावर शिबंदी वाढवायच्या कामगिरीवर पाठवले. अशा तऱ्हेने खानाने नको त्या सरदारांना बाजूला केले आणि हव्या त्या सरदारांचा विश्वास संपादन केला. खानाच्या युद्ध पूर्व आखणीची, चातुर्यपूर्ण चालींची माहिती आपल्या सरदारांमार्फत पूर्ण तळभर पसरवून त्याने आपला दबदबा वाढवला. अलि आदिलशहाच्या दरबारी आपल्या कामगिरीची माहिती सोबतच्या सरदारांकरवी पत्रातून कळवत राहून कोण आपल्या अपरोक्ष विजापुरात संपर्कात आहे यावर बारीक लक्ष आहे याची जाणीव काहींना करून दिली.

पावसाळ्याच्या काळात वरकरणी अजगराच्या सुस्तीसमान असल्याचे दाखवून खानाने एका मागे एक चाली रचून आपले नियोजन पक्के केले. सिवाच्या हेजिबास काय अटी पुढे ठेवायच्या यावर विचार केला गेला त्यातून कच्चा मसूदा बनला.

“निजामशाही विलयाला गेल्यावर मुगलांनी आदिलशाहीला मिळालेल्या परगण्यातील मुलूख सिवाने हस्तगत केला आहे. जंजीरा किल्ला व दंडा राजापुरीच्या सिद्धी जोहरास सिवाने कोंडीत पकडले आहे. कल्याण भिवंडी मुकासे आपल्याशी जोडून घेतले आहे. जावलीच्या मोरेचा जंगलातील भाग सिवाच्या ताब्यात गेला आहे.”

वरील सर्व उद्धट प्रकार सिवाकडून झाले आहेत. सिवाच्या वडिलांच्या सेवेचा मान राखून विजापूरच्या तख्तावरील बादशाह अलि आदिलशाह यांनी दखल घेऊन अफ़झलखान मुहम्मदशाही यांना नियुक्त केले आहे. त्यांचे बरोबर सामोपचाराने तह करून त्यांना वरील मुलूख परत करून द्यायच्या तहनाम्यावर सही शिक्कामोर्तब करायला सिवाला वाई येथे यायचे आहे."

“ सामोपचाराचा मार्ग नाही मानल्यास अफ़झलखान सिवा विरुद्ध लष्करी कारवाई करायला मोकळीक राहील. आदिलशाहीच्या मार्फत (मराठीत) बोलणी करायला वाईतील हवालदार कृष्णाजी भास्कर यांची नेमणूक केली आहे."

अफ़झलखानाच्या डेऱ्यात आलेल्या गोपीनाथ बोकील या वकिलास मसूदापत्र दिले गेले. तो वकील या पुढे डेऱ्याच्या आत दाखल होता कामा नये. जे बोलणे करायचे ते चौकीच्या बाहेर करायचे हुकूम दिले गेले. पुन्हा भेटीत गोपीनाथ बोकिल हकीकत घेऊन आले, “सिवाची अतिशय केविलवाणी अवस्था आहे. ते आपल्यासमोर सादर व्हायला घाबरतात. मोठ्या मनाने माफ करून त्यांनी आपल्या जाहगिरीत सामिल प्रदेश परत करायला जावलीच्या मोरेच्या किल्ल्यावर यावे. तिथले सृष्टी सौंदर्य पहात तहनाम्यावर दस्तखत करून द्यायला ते तयार आहेत.”




“मुळीच नाही, सृष्टी सौंदर्य पहायला नंतर दौरा करता येईल.” असे कृष्णाजी भास्कर कुलकर्णीतर्फे गोपीनाथ पंतला सांगायला आज्ञा केली गेली. गोपीनाथ पंतांनी तहनाम्यावर सही शिक्का मोर्तब करायला शिवाजी अगदी तयार आहेत हे वारंवार बिंबवले!

“आपल्या जावळीतील गढीत भेट करायला काय हरकत आहे? ती गढी सिवाच्या ताब्यात नाही. आपल्या पठाण तुकड्यांना सुरक्षारक्षक करायला शक्य आहे. निवडक पाच हजार सैनिक नेता आले तर?" अशी मसलत केली गेली. "सिवाने फक्त काही निवडक शिपायांसह यावे, अशी अट टाकली तर जावळीत त्याला नंतर गिरफ्तार करायला सोपे आहे. एकदा तहनाम्यावर शिक्कामोर्तब झाल्यावर तो पळून जाईल कुठे? कोकणात?"

आता वाटाघाटीत आणखी वेळ घालवला तर रोजचा वाढता खर्च चिंतेचा विषय आहे, शिवाय सेनेतील लढाई करायचा जोश ठंडा पडेल. अलि आदिलशाह पावसाळा सुरू आहे म्हणून गप्प आहे. आता वेळ आणखी काढला तो ही तगादा लावेल. म्हणून चेंगटपणा करायच्या ऐवजी जावळीतील गढीवर तहनाम्यावर सही शिक्का करायला मानले गेले. आपणहून जंगलात जायची काय गरज आहे असे कुरकुरणाऱ्या सरदारांची समजून काढली.

तिकडे गोपीनाथ पंत लगबगीने परतले. आणि खानाने तातडीने तायघाटातील रस्ता दुरुस्तीचे कामावर स्थानिक कामगार खानाच्या लोकांच्या देखरेखीत कामे करू लागले. सकाळच्या वेळी गडद धुक्यातून जाताना भिलार, गुरेघर, लिंगमळा, करत महाबळेश्वर पठार कुठून पार करता येईल ते वाटाड्यांना बरोबर घेऊन सराव केला गेला.

जावळीला जायच्या २, ३ वाटा पक्क्या केल्या. तिथे रस्ता दुरुस्तीचे काम सुरू झाले. काही जनावरांवर

बोजड सामान लादून घाटातील जीवघेण्या वळणावर सराव करायला पाठवले गेले. जळवांवर नव्याने मातीचा थर टाकला. कारवीसारख्या झुडुपांची तोडणी करवून घेतली.

सर्व तयारी होत असताना ऑक्टोबर महिना संपला. पाठवलेले मराठा सरदार परत आले. (सध्याच्या एल्फिन्स्टन पॉइंटच्या) एका टोकावरून खाली उतरून थेट जावळीच्या मागील मेटावर जाता येते, ती शक्यता तपासण्यासाठी दोर शिड्यांच्या गुंडाळ्या, खुंट्या, मेखा, जादाचे दोर तिकडे पाठवले गेले. आपल्या सरदारांना डोंगरांच्या रांगाचे, रस्त्याचे कच्चे नकाशे काढून आपापल्या सैनिकांना कुठून, कुठे जायचे आहे, वेळ किती लागेल, खायची व्यवस्था कुठे आहे वगैरे तपशील रोज दिले जात राहिले.

स्व. निनाद बेडेकरांनी एका भाषणात जावळीचे खोरे व गाव एल्फिन्स्टन टोकावरून भीषण दरीत खाली दिसते असे म्हटले

Elphinstone Point
एल्फिन्स्टन पॉइंट
Jaoli
जावळी
Lodwick Point
लॉडविक पॉइंट

पुढे चालू...

## मिपावरील अभिप्राय

... माझ्यासारखे काही ओक सरांच्या माहितीपूर्ण लेखमालेच्या पुढील भागाच्या प्रतिक्षेत चकरा मारू लागले तर नवल नाही.
मला त्यांच्या बरोबर प्रवास करायचा अनुभव आहे.
नेपाळमधील भृगू संहितेच्या शोधात आम्ही एकत्र होतो.
तर एकदा तंजावुरच्या तमिळ विश्वविद्यालयात कूट तमिळ भाषेतील शब्द रचनेची व्हिडिओ क्लिप दाखवायला मला संधी मिळाली.
कांचीपुरमच्या मठात जयेंद्र सरस्वतींच्या आशीर्वाद घेऊन बाहेर पडणाऱ्या मॅड्रास हायकोर्टातील जस्टिस व्ही कनगराज यांच्या परिचयावेळी मला हजर राहायला मिळाले.
कधी तिथल्या तिथे तोंडावर समोरच्याला गप्प करताना मला ते आठवतात. तर असीर गडावरील चढण, कांचनबारीतील घाटातून तरुणांना लाजवेल अशा उत्साहात फेरफटका मारताना त्या त्या भागात समर कसे घडले असेल यावर त्यांचे भाष्य मिलिटरी कमांडरच्या अनुभवाची साक्ष देते.
अफजल खानाकडून मोहिमेची तयारी कशी केली गेली असावी याची कल्पना या भागातून समजून येते.

... "नालबंद कारागीर घोड्याच्या खुरांना नवे नाल मारून आपली कमाई करत होते. लोहारांच्या भट्ट्यात भर पावसात पेटवल्या जाऊन नवे नाल, खिळे बनत राहिले. मुस्लिम सरदारांच्या दाढ्यांना आकर्षण रंगीत करून मिशा साफ करणे यावर नाई लोकांना उसंत मिळेना!"
सैनिकांची, सरदारांची मनोवृत्ती, ते वातावरण इतक्या कमी शब्दात वर्णन केले आहे... मस्त वाटले वाचताना.

एक विचारणा...
20 Mar 2020 - 5:43 pm | *शशिकांत ओक*

या लढ्यातील महत्वाचे सरदारांच्या नावात बाजी प्रभू यांच्या नाव घेतले जात नाही. पण एकदम पावनखिंडीच्या संदर्भात ते उपस्थित होते. मनो यांनी ते प्रताप मोरे यांच्याकडून असावेत असे मेहेंदळे यांच्या ग्रंथात वाचल्याचे स्मरते असे म्हटले आहे.
यावर इतराना प्रकाश टाकायला विनंती करतो.

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग ६ जावळीतील युद्ध व्यूह

भाग ६

### जावळीतील सैन्य व्यूह

जावळी नुसते एक गाव नसून त्या काळात विस्ताराने, लोकसंख्येने व मानाने मोठे संस्थान होते. भावाभावात ८ ठिकाणात वाटलेले असले तरी आदिलशाहीशी ईमान राखून होते.

## जावळीच्या संस्थानाचा आवाका



(चंद्रराव पदावर) येसाजी मोरे जावळीचा संस्थानिक होता. त्याचे महाराजांशी संबंध जाने १६५६ पर्यंत बरे होते. आदिलशाहीतील गादीच्या वर्चस्वासाठी गोंधळाच्या परिस्थितीचा विचार करून जावळी आपल्याकडे करून घेण्यासाठी महाराजांनी मोहीम उघडली. त्या काळात मोरेच्या बाजूने महाराजांच्या सैन्यावर छुपे हल्ले होत होते. पुरंदरहून महाराज १० हजार सैन्यास घेऊन निघाले. सेनेचे दोन तुकडे करून घोडदळाची मोठी फौज रडतोंडी घाटातून जावळीत घातली. लहान पायदळाची तुकडी महाराजांच्या नेतृत्वाखाली म'श्वर मार्गे निसणीच्या अतीशय तीव्र उताराच्या घाटमार्गातून जावळी गावात घुसली. चकित झालेला चंद्रराव फारसा प्रतिकार न होता रायरीला पळाला. महाराजांनी जावळीचा कोट मिळवला. पण महाराजांच्या सैन्यावर चंद्ररावाकडून हल्ले करून हैराण करायची खेळी केली गेली. मात्र शेवटी महाराजांनी त्याचा बंदोबस्त केला. त्यानंतर साधारण (३ महिने ६ एप्रिल १६५६) महाराजांनी तिथेच तळ ठोकला होता. घनदाट जंगलात लपायला सोईचे असल्याने बलाढ्य शत्रूला लोळवायचे असेल तर जावळीच्या जंगलाचा फासच उपयोगी पडेल असे त्यांनी त्याच वेळी मनात ठरवले असावे. जवळच्या भोरप्या वा ढोरप्या नावाच्या प्राचीन गडाची सूक्ष्म पाहणी करून त्याचे दरवाजे, बुरुज, माच्यांच्या डागडुजी करून नव्या रूपात सजवायची आज्ञा दिली. भवानी माता मंदिरात रोज पुजाअर्चा, तेल पाण्याची सोय आपल्या स्वतःच्या खजिन्याकडून चालू केली. किल्ला बांधून तयार झाल्यावर गौरवाने त्याला **प्रतापगड** नाव दिले.

# जुन्या घाटांच्या जागा



३ महिने जावळीत राहिल्यामुळे वेगवेगळ्या वाटा, घाटमाथे, नद्यांच्या काठावरून चढणीचे मार्ग वगैरे त्यांच्या मनात ठसले होते. काहींना एकदा पाहिले, ऐकले, वाचले की पक्के लक्षात राहते ही देणगी जन्मजात मिळते. महाराजांना ती मिळाली असावी. म्हणून जुन्या आठवणीतून महाराजांनी राजगडावरून मसलत करून नुकत्याच डागडुजी केलेल्या प्रतापगडाची निवड केली. समजा मधल्या काळात पुरंदरवर हल्ला झाला तर त्याच्या रक्षणासाठी घोडदळाचे सरनौबत नेतोजी पालकरना ठेवून दिले. जुलैच्या १० तारखेपर्यंत आपल्याबरोबर मोरोपंत पिंगळे, कान्होजी जेधे, बांदल, शिळीमकर, बाजी सर्जेराव, रंगनाथ पासलकर अण्णाजी दत्तो यांच्या छबीन्यातील पायदळाच्या साधारण ३ ते ४ हजार शिपायांच्या तुकड्यांना घेऊन भर पावसात प्रतापगडावर राहायला गेले. रघुनाथ बल्लाळ अत्रेंनी कोकण पट्टीतील घोडदळाचे २ हजार सैनिक आणायला आज्ञा दिली गेली. तुफान पावसाळ्यात सर्व सैनिकांची राहायची, खाण्याची सोय जावळीच्या गावात आणि आसपासच्या खेड्यात केली. पावसाचा जोर कमी होत गेला. त्यानंतर वाटाघाटीतून खानाने जावळी खोर्यात यायचे कबूल केल्यावर आपल्याला कडील सरदारांनी कुठे आपले सैनिक लपवून ठेवायचे याची चर्चा झाली.

## खानाचे जावळी खोऱ्यात आगमन




सोबतच्या नकाशावरून डोंगर दऱ्या,धरणसाठे, पठारी जागा, वगैरेची कल्पना येते. अशी अचुक नकाशाची सोय नसतानामार्ग आखणी करायला स्थानिक वाटाड्यांच्या, चपळ खेडूतांच्या मदती शिवाय शक्य नाही असे जाणवते.

वाईहून खान बिनकामाचे प्रचंड संख्येत असलेले लोक, जनावरे वाईतच तळावर सुरक्षित ठेवून निवडक स्वतःचे ५ हजार पायदळ आणि २ हजार घोडदळ सैन्यास घेऊन पहाटे निघाला. सैन्याच्या बरोबर त्याचे मोठे नामी सरदार आपापल्या सेनेच्या जत्थासह आज्ञापालन म्हणून येत होते. आपले सरदार सिवाच्या भेटीला जंगलात जायचे ठरवल्याने खट्टू आहेत हे तो जाणून होता. जावळीतील सापळ्यात सिवा आपणहून अडकलेला आहे. अशा वेळी माझ्यासारख्या अचाट साहसी, बलवान, शूरवीराने त्याच्या घरात जाऊन त्याचा निकाल लावला तर त्यात माझी इभ्रत आणि शान वाढणार आहे. या त्याच्या जोरदार म्हणण्याला कोणाकडेच उत्तर नव्हते! ही मोहीम फत्ते झाली की हेच आदिलशाहीशी सध्या इमानदार असलेले पण आत्ता माझ्यावर रुसलेले सरदार माझ्या नेतृत्वाखाली यायला उतावीळ होतील! अशी त्यांची खात्री होती!

हत्तीवरून जायची हौस असूनही तायघाटात चिंचोळ्या, वेड्यावाकड्या वाटा चढताना तो कधी घोड्यावर तर कधी पालखीतून उतरून पायी चढत होता. पुढच्या उज्ज्वल भविष्यासाठी ही जंगलाच्या लढाईची यातायात काहीच जास्त नाही असे त्यांचे पक्के मत बनले होत

# तायघाटाचा अपेक्षित मार्ग

**पारशी पॉईंटकडून खाली पाहताना**

**चिखली गावाचा दूरचा प्रदेश पाहताना**






चिखली गावातून तायघाट चढेपर्यंत तो सर्वात मागे होता. कोणी कुचराई करून मागच्या मागे सटकून जाऊ नये म्हणून त्याला ही दक्षता घेणे आवश्यक होते. आपण लावलेल्या बिगारांनी पाथरवट, गवंडीं बरोबर दुरुस्तीचे काम चांगले केले आहे, हे त्याच्या सूक्ष्म नजरेतून सुटले नाही. दुपारी घाट संपून भिलार गावाचा तिठा पार पडला. शस्त्रे व इतर सामान घेऊन जाणाऱ्या बैलांच्या पाठीवरील झुलीप्रमाणे लादलेल्या कंठाळ्यातील पडशातून बरोबर आणलेल्या आणलेले खायचे पदार्थ खाऊन पुढच्या प्रवासाला निघाले.

**पारशी पॉईंटवरून धोम धरणाच्या बाजूचे रम्य प्रातिनिधिक चित्र**



त्यानंतर तो पुढे - बाकीचे मागे, असे करत मेटगुताड, गुरेघर, लिंगमळा, वेण्णा तलावाच्या काठाने रडतोंडी घाटापाशी आला. आपल्या सैन्याचे मनोधैर्य उंचावायला ३ महिने खाऊन पिऊन सुस्त पडलेल्या सैनिकांना उद्देशून खणखणीत मोठ्या आवाजात म्हणाला, "माझी प्रचंड शरीरयष्टी, माझी पराक्रमी कारकीर्द, माझी युद्धात कधीच पळून न जायची वृत्ती तुम्ही ओळखता. मी म्हणजे जय असे खुद्द आदिलशाहनी मला या मोहिमेवर जाताना गौरवले होते. आता तुम्हाला तुमचे शौर्य, साहस पणाला लावून मोठ्या कष्टाने ही मोहीम फत्ते करायची संधी अल्लाच्या मेहेरबानीमुळे आली आहे. जंगलातील लढाई या पैकी अनेकांनी पहिल्यांदाच खेळली असणार आहे. पण मी अशा या जंगलात दिवस रात्री ना खाता न पिता, मोहिमांमध्ये यशस्वी झालो

आहे. तुम्हीही उमदेपण दाखवा. तुमच्या पराक्रमाची शर्थ करा. तुम्हारे हाथों से दुश्मन काफिरोंकी मौत इन्शाह अल्ला इंतजार करती हैं. तरक्की आपके पांव चूम रही हैं. फिर ७२ हूरें तुम्हें यही मिलेंगी!"




कंटूर नकाशात ४शे मीटरची उंची पार करून म.श्वरच्या पठारावर येता येते दर्शक चित्र...

अफझलखानाची ललकारी देणारे त्याची पदवी म्हणून शेवटी झिंदाबाद असे वदवून घ्यायला तत्परतेने भोंग्यावरून पुकारत राहिले. पहिल्या नमाजानंतर उद्या पहाटे निघालेच पाहिजे असे बजावून बजावून सांगितले गेले. एरव्ही टंगळमंगळ करून नमाज़ी टोपी शोधत नमाज़ाची वेळ साजरी करणारे उद्याच्या नमाज़ाची बांग ऐकताच पहाटे लवकर उठून तयार झाले. निघाल्यावर वाटेतील भीषण निसर्ग पहात रडतोंडी घाटातील वेडीवाकडी वळणे पार करताना त्यांना आपण नक्की कोणत्या दिशेने जातोय याचा विसर पडला होता! पावसाळा संपल्यानंतर घनदाट वाढलेल्या वेली, गर्द हिरव्यागार झुडपाच्या फांद्या वारंवार बाजूला करत खानाच्या नौबतखान्याची, हत्तीच्या माहुताची त्रेधा उडत होती. त्यांच्या चेंगटचालीला कंटाळून खान आपल्या आवडत्या घोड्यावर स्वार होऊन पटापट पुढे सरकत गेला

**महाबळेश्वरचे पठार ओलांडून प्रतापगडाकडे नेणारा रडतोंडी घाट आता बराच सोईस्कर पसरट झाला आहे. पुर्वी तो जास्त तीव्र उताराचा होता.**







जुन्या व नव्या रडतोंडी घाट रचनेत काय फरक झालेला असावा? यावर तिथले रहिवासी, गिरीप्रेमी, यांच्याकडील माहितीच्या मदतीची गरज आहे. सनसेट पॉइंटकडून निघणारा सध्याचा लांबचा मार्ग नव्याने इंग्रजांच्या काळात झाला असावा. सन१९७२च्या दुष्काळीकामातून वळणदार रस्त्यांना शक्यतो सरळ करायची कामे केली गेली होती, त्यातूनही मार्गात बदल झाले असावेत.

सरदारांच्या सेना सावकाश, सावधपणे खाली उतरून कोयनेच्या काठावरील वेळूच्या बनात आपापल्या टोळ्यांचे कोंडाळे करून तळ ठोकला. तिथून जवळ जावळीच्या मुख्य कोटाकडून येणारे कोयना नदीचे पात्र होते. प्रतापगडावर चढून जायला नेणारी वाट तिथून पुढे सुरू होत होती.

खानाचा शाही हत्ती डुलत यायला वेळ लागला, तोवर खानाच्या राहण्याची सोय जावळीच्या मोऱ्यांनी आपल्या महालात केली. भेटीची तारीख १० नोव्हेंबर ठरली होती. त्याआधी २ रात्री म्हणजे ७ तारखेला रात्री उशिरापर्यंत दिवट्यांच्या प्रकाशाच्या अनुरोधाने सैनिकांचे जथ्थे येत राहिले. खान जातीने लक्ष घालून कोण सरदार कुठे तळ ठोकून हवेत यावर आपले निर्णय देत होता. खानाने रात्रीची विश्रांती घेऊन आपल्या सरदारांशी पुढील हालचालींसाठी चर्चेला ८ तारखेला सकाळी नमाज़ नंतर बोलावले. त्यात चार प्रमुख प्रस्ताव होते.

१. मला १५०० कसलेले बंदे पाहिजेत. जे पटापट डोंगर चढून माझा मोठा मुलगा फाज़ल खानाच्या हुकुमाची वाट पहात वाटेत दबा धरून बसतील. ते मी निवडले आहेत.

२. आपल्यापैकी सरदारांनी मी सिवाला भेटून येई पर्यंत मुख्य सेनापती मुसाखान यांच्या आज्ञा पाळाव्यात. अंकुश खान आणि अन्य पठाण सरदारांची सेना, सिद्दीचे सैनिक, मराठा सरदार सरदारांची नेमणूक कुठे करावी याचा निर्णय मूसाखान घेतील.

३. पंत गोपीनाथ वकीलांना बोलवून सिवाला इथे जावळीतील कोटात बोलवायचे म्हणून आदेश दिले होते. तुम्ही प्रतापगडावर यावे तिथे आपल्या आगमनानिमित्त शामियाना उभारून ठेवून आम्हाला आपल्या मेहमाननवाजीसाठी बडदास्त ठेवायला सिवाला संधी द्यावी तर मेहेरबानी होईल. असा त्यांचा प्रस्ताव आला आहे. त्यावर मी मोठ्या मनाने मान्यता दिली आहे.

४. या शिवाय आपल्या बरोबरच्या सरदारांच्या मानपानसाठी भारी कापडाची, रत्नजडित शस्त्रांची भेट देण्यासाठी सिवाने आपल्या बरोबर आलेल्या सराफ, कापड व्यापारी बजाजांना गडावर बोलावले आहे. त्याला मान्यता द्यावी असे मी ठरवले आहे. यातून गडावर काय सैनिकी तयारी चालवली आहे याची माहिती ते परतल्यावर सांगतील.

सर्व सरदारांची संमती आहे असे मी मानतो, “खुदा हाफ़िज़" म्हणून सभा दहा मिनिटांत बरखास्त झाली! ८ तारखेला खानाने आपल्या सेनेची शिरगणती करायला आपल्या सरदारांना आदेश दिले. त्याने प्रत्येक सरदारांची आपणहून चौकशी करून कारवाई कशी करायची. यावर आपले मत सांगितले. शिपायांच्या खांद्यावर हात ठेवून त्यांना आपलेसे करायची संधी त्याने गमावली नाही.

आपल्या १५ शे निवडकांना उद्देशून तो म्हणाला, 'खरे तर मी तुमच्यावर अवलंबून आहे. माझ्या सिवाच्या भेटीनंतर लगेच कर्णा, तुतारी वाजेल. तेव्हा तुम्ही प्रतापगडावर चाल करून जायचे आहे. मी सिवाला निपटणार आहे. तुम्ही फाज़ल खानाच्या बरोबर जाऊन गड काबीज करायचा'. 'रात तक हमें यहां रुककर बिजापूरको रवाना होना पडेगा.' आपल्या अगदी जवळच्या अंगरक्षकांना वेगळे बोलावून खान म्हणाला, 'तुम्ही घुडसवारों के साथ कोंकणात उतरून राजगड पर जाकर सिवाच्या आई आणि मुलाला जीवंत पकडून माझ्या समोर आणायचे. जो हे काम पूर्ण करेल त्याला प्रतापगडचा किल्लेदार म्हणून नेमणूक करीन.' दिवसभरात सिवाच्या सैन्याकडून कोणताच हल्ला झाला नाही यावरून सैनिकांना सिवा 'डर गया' असे वाटून हाय से वाटले. मात्र काही सरदारांच्या राहुट्यात चर्चा सुरू झाली की काही तरी गडबड आहे. आपण येण्याच्या आधी सिवाचे लोकांनी शरारत करायला डाव रचला आहे. आपल्याला त्याचे सैन्य कुठे लपवले आहे याचा शोध घेण्यासाठी आपले हेर आजूबाजूला पाठवले पाहिजेत.

नेतोजी पालकरचे घोडदळ पुरंदरला आहे कि या गडावर आहे? आपल्यावर अचानक हल्ला आज रात्री होऊ शकतो. त्यामुळे सरदारांनी आपापल्या हाताखालच्या सेनानींना सतर्क रहा म्हणून इशारा दिला.
९ तारखेला व्यापारी लोक गडावर गेले ते परत आले नाहीत. यामुळे चिंता वाढली. चंद्रराव मोरे किल्लेदारावर काम दिले, 'खंडोजी खोपडेला शोधून समोर आणा. तो सिवा कडून मिळाला होता. त्याचे वर लक्ष ठेवा.

कान्होबा नाईक जेधे कुठे लपला आहे ते शोधून काढा. तुला जर जमले नाही तर तुझी किल्लेदारी गेली आहे असे समज. जा कामाला लाग'.

खानाने आपल्याबरोबर आलेल्या मराठा सरदारांची भेट घेतली. 'तुम्ही जर सिवाला मदत केली तर तुमचे मुंडके मी माझ्या हाताने कापीन' असा सज्जड दम भरला!

अजगराप्रमाणे आवळत आणलेल्या विळख्यातून सिवा सटकता कामा नये यासाठी त्याने विचारपूर्वक सर्वांना कामाला लावले.

खानाचा एक जुना बुड्ढा सेवक सर्व पहात होता. गुसलखान्यापासून ते खानाच्या हत्यारांची तपासणी, धार करणे, अंगरखे धुणे, गुडीगुडी तयार करणे, खाण्याचे पदार्थ आधी खाऊन विषबाधा न होऊन देणे, रात्री बिछाना लावून पाय चेपणे कामात तत्पर त्याच्या नजरेत एक बात खटकत होती. खानाकडे संपूर्ण छातीभराचे चिलखत नव्हते. जी होती ती जुनी, आडमाप होती. खानाने चिलखत घालावे असे सुचवले तर तो आपल्यावरच ओरडेल की तू का नाही बरोबर घेऊन आलास? म्हणून तो गप्प बसला!
१० तारखेला सकाळी नमाज़ अदा करून नाश्त्याला त्याने कृष्णाजी भास्कर कुलकर्णीला बोलावले. त्याने दोघांच्या बाजूने तयार केलेला तहाचे मसौदे वाचून दाखवले. भेट घ्यायला काय रीत (प्रोटोकॉल) सांभाळायची? तहावर सही शिक्के मारून झाल्यावर काही खास खाण्याची व्यवस्था करण्यात आली आहे का? वगैरे विचारून घेतले. अंगावर शेरवानी चढवताना तिथे ठेवलेले चिलखत त्याने पाहिले. घालावे कि न घालावे असा विचार करत असताना, 'मी असा बलवान, कधी ना हार जाणारा, मला कोणाची भिती?' असा स्वतःच्या शक्तीवरील गर्व झाला.

महाराजांकडून खान जावळीत आल्यापासून २ दिवसात काही सैनिक हालचाली झाल्या नाहीत. फक्त पंत खानाची योग्य बडदास्त ठेवली जाते आहे, मसौदा तय्यार आहे, वगैरे माहिती घेत होते. नेतोजी नेमका कुठे असेल? त्याने वाईच्या खानाच्या तळावर तुफान हल्ला करून पूर्ण नाश करायचा आहे. मोरोपंत पिंगळे यांनी पार तिठ्याकडून हल्ला करून कोयनेच्या पात्रात खानाच्या सेनेला दाबून धरले पाहिजे. तोफांच्या आवाजानंतर त्यांनी गडावर येऊन गड हातातून जाऊ नये म्हणून शिकस्त करायची. बाकी सर्व सरदारांची सेना गेले ३ दिवस झाडीत लपून राहिलेले आहेत त्यांनी आपल्या पोटा पाण्याची सोय केली असेल का? बाबा भोसलेंना महाबळेश्वरच्या मंदिर परिसरात लपायचा सांगितले आहे, त्यांच्या हातून काही गफलत होणार नाही ना, नारायण बामण, अत्रे, कान्होजी जेधे यांच्या कडून जबर शौर्याची अपेक्षा आहे, असे महाराजांनी सहकाऱ्यांना बोलून दाखवले.



१० तारखेला सकाळी भवानी मंदिरात पूजा करताना, त्यांच्या मनात तीन पर्याय आले.
आम्ही दोघेही मरू.
खान मरेल मी जखमी.
मी मरेन खान जबर जखमी होऊन पुन्हा परत येणार नाही.
माझ्या पश्चात सुरू केलेला लढा मां साहेबांनी चालू ठेवावा, बाकी तो श्रींची इच्छा!

## भेटीचा वृतांत

पंतांनी खालून पाठवलेला निरोप ऐकून १५ शे हशम जनीच्या टेंभावरून गड घेण्यासाठी वर आले तर आपल्या सेनेला खानाच्या सैनिकांना कापून काढायला अवसर मिळणार नाही हे जाणून महाराज गडावरून खाली यायला तयार होईनात. १५शे हशमांना कोयनेच्या पात्राकडे पाठवा म्हणून तक्रार केली. खानाच्या कानी पडल्यावर 'आता हे काय नवे लचांड?' म्हणून वैताग वाढला. 'ठीक आहे! पण सिवाला बोलवा', असा निरोप कृष्णाजी भास्कर कुलकर्णींतर्फे दिला व हशम परत गेले!

गडाचा मुख्य दरवाजा व समोर

सध्याची कार पार्किंगची

या पट्ट्यातील खानाच्या १५शे हशमांना महाराजांनी युक्तीने खाली पाठवले. ते नेमके दबा धरून बसलेल्या मावळ्यांच्या तावडीत सापडले. खानाच्या १० अंगरक्षकांवर अचानक हल्ला करून त्यांना लोळवले गेले.

भेट स्थळ

Pratapgad Fort
किल्ले प्रतापगड

Shivdurg Hotel Pratapgad

Shivkalin Khedegaon

Kiran more Strawberry Farm

Post Office

Google

भेटस्थळ

Pratapgad fort
प्रतापगढ किला

Rajpuri
राजपूरि

Vardyani Valley Farm Stay

The Mountain Village,Agro

खानाचे पसरलेले तळ

Shivkalin Khedegaon

Pratapgad hotel

मराठ्यांनी दाबून ठेवलेल्या जागा

मराठ्यांनी दाबून ठेवलेल्या जागा

Google

शामियान्याची शोभा पाहून खान खूष झाला. 'चूहेने बड़े चाव से बिल सजाया है!' सिवा आला. रीतीने दोघांची ओळख वकीलांनी करून दिली. मंचावर चढून जाऊन तहनाम्यावर शिक्कामोर्तब करायला म्हटले गेले. रीत न पाळता खानाने प्रेमाने सिवाला जवळ करायला हात पसरले.



महाराजांना पर्याय नव्हता. त्यांना जुजबी जवळीक निर्माण होईल इतपत जवळ जाणे भाग पडले. खानाच्या हातांचा विळखा घट्ट होत गेला.

पाठीवरून सरकन शस्त्र चालल्याने धक्का बसला. आता संधी आहे म्हणून महाराजांनी खानाच्या पोटात शस्त्र खुपसले आणि पोट फाडले. खान हातातील शस्त्र टाकून 'या खुदा' म्हणून, जखमी पोटाला आवरून धरून मंचावरून धडपडत खाली आला. तेव्हा वकिलांनी मदत केली. महाराज गडाकडे धावत सुटले. खानाला भोयांनी पालखीत घालून न्यायला सुरूवात केली. खानाच्या, महाराजांच्या बाजूच्या शिपायांच्यात हातघाईची मारकाट सुरू झाली. पळणाऱ्या पालखीतून खाली पाडून खानाचे मुंडके धडा वेगळे झाले. अचानक शामियान्याकडून कर्णे, तुतारीचे आवाज येताना ऐकून खानाच्या सरदारांना काम सहजपणे झाले आहे असे वाटत राहिले.






## खानाच्या सैन्याची वाताहत

शिवाजी महाराज वर आल्यावर गडावरून तोफांचे आवाज ऐकून लपलेल्या शिवाजी महाराजांच्या सेनेने 'हर हर महादेव' अशी रणगर्जना करून हल्ला बोल केला. गडावरून तोफाबारी का चालू झाली? आता काय करायचं? म्हणून गोंधळलेल्या खानाच्या सरदारांना आपल्या सेनेला काय आदेश द्यावेत हे कळेना. १५ शे हशम गडावर चढायच्या चिंचोळ्या वाटेत अडकून पडले. गर्द झाडीतून एकाएकी आलेल्या मावळ्यांचे प्रहार त्याना सहन करता येईनात.

खानाचे या भागातील अडकून पडलेले सैन्य कोयनेच्या उगमाकडील भागात पांगले.

मुसाखानाला खान अजून पालखीतून वरून खाली का येत नाही म्हणून काहीतरी गडबड आहे असे वाटून आपल्या बरोबर सहकाऱ्यांना घेऊन जावळी गावातील कोटाकडून आला. काही तासात खान गारद झालेल्याची बातमी लगेच पसरली. दुपारच्या ४ पर्यंत खानाच्या बाजूने लढणाऱ्या सेनेला भगदाड पडून कुठे पळून जावे ते कळेना. काही वेळाने त्यांना कळले की खानाचा घात करून मारले गेले आहे. 'आपल्याला आता लढण्यात अर्थ नाही' असे लक्षात घेऊन त्याने माघार घ्या म्हणून आदेश दिले. आपल्या महत्त्वाच्या सरदारांना बोलावून या इथून परत वाईला कसे जायचे यावर खल केला.

चंद्रराव मोरेला (आठ भावांपैकी कोणा एकाला) धरून आणले गेले. त्याने आपले काही वाटाडे देऊन कोयनेच्या उगमाकडून निसणीच्या घाटातून वर चढून गेल्यावर महाबळेश्वर पठार लागेल म्हणून बरोबर दिले. फाज़ल खानाला बापाची लाश शोधावी का पळून जावे समजेना. आपल्या दोन भावांना, १५ शे हशमांबरोबर मारले हे ऐकून आता इथे थांबले तर आपणही जगणार नाही असा विचार करून निराश होऊन कोयनेच्या काठाने उगमाकडे निघाला. बाकीचे सरदार त्याला भेटले,

कोणी काही बोलत नव्हते. १० तारखेची अंधारातील ती रात्र सर्वांना कायम लक्षात राहिली



सापडेल त्या वाटेने धावत निघाले. मुख्य सरदार कोयनेच्या उगमाकडून निसणीच्या अवघड तीव्र चढणीने कसेबसे जावळीच्या जंगलपिंजऱ्यातून सटकले. बाकीच्यांना निशस्त्र शरणागती शिवाय जीव वाचवता येणे शक्य नव्हते. काही वाटेत दमून मेले

.



**अफ़झलखानाच्या_कबरीचे_सध्याचे_रूप**

पुढे चालू



## मिपावरील अभिप्राय

… > १० तारखेला सकाळी भवानी मंदिरात पूजा करताना, त्यांच्या मनात तीन पर्याय आले.

इथे फोटो तुळजाभवानी मंदिर, तुळजापूर इथला आहे, तो त्याऐवजी प्रतापगडाच्या भवानी मंदिराचा पाहिजे का? कारण महाराजाना त्या वेळी तेच मंदिर सहज पूजा करता येण्याजोगे होते.

> १५०० इथे कापले गेले, इथे अडकले ते मेले, इथले शरण आले

ही माहिती कोणत्याच साधनात मला सापडली नाही, त्यावरून बहुतेक ते तुमचे निष्कर्ष असावेत. जर मूळ माहिती वेगळी, त्यावरून तुमचे निष्कर्ष वेगळे आणि ते तसे का असावेत असं जर थोडं लिहिता आलं तर समजून घेणं सोपं पडेल. नाहीतर मग कादंबरी स्टाईल सर्वच काल्पनिक मानायचे असेल तर तसेही चालेल.

> १० तारखेला सकाळी भवानी मंदिरात पूजा करताना, त्यांच्या मनात तीन पर्याय आले.
> आम्ही दोघेही मरू.
> खान मरेल मी जखमी.
> मी मरेन खान जबर जखमी होऊन पुन्हा परत येणार नाही.
> माझ्या पश्चात सुरू केलेला लढा मां साहेबांनी चालू ठेवावा, बाकी तो श्रींची इच्छा!

महाराजांच्या मनातले विचार कुठेच लिहिलेले नाहीत, त्यावरून हा भाग तुम्ही कादंबरीकाराच्या भूमिकेत कल्पनेने लिहिला आहे असं धरून चालतो.
...

शंका निरसन २
22 Mar 2020 - 12:39 pm | *शशिकांत ओक*

खालील वक्तव्य कोणाला पटवून द्यायला करत नाही. मात्र माझे विचार कळणे महत्वाचे वाटले म्हणून लिहित आहे.
मनो म्हणतात...

> **१० तारखेला सकाळी भवानी मंदिरात पूजा करताना, त्यांच्या मनात तीन पर्याय आले.**
> **आम्ही दोघेही मरू.**
> **खान मरेल मी जखमी.**
> **मी मरेन खान जबर जखमी होऊन पुन्हा परत येणार नाही.**
> **माझ्या पश्चात सुरू केलेला लढा मां साहेबांनी चालू ठेवावा, बाकी तो श्रींची इच्छा!**

महाराजांच्या मनातले विचार कुठेच लिहिलेले नाहीत, त्यावरून हा भाग तुम्ही कादंबरीकाराच्या भूमिकेत कल्पनेने लिहिला आहे असं धरून चालतो.
इतिहासाच्या कुठल्या पानावर काय लिहिलेले आहे किंवा नाही याचा संदर्भ माझ्या सादरीकरणात असेल असे नाही. किंबहुना मिलिटरी कमांडरांच्या नजरेतून पाहताना ज्या ठिकाणी पुरावे मिळत नाहीत अशा दुव्यांचे ठिपके जोडून चित्र उभे करायचा प्रयत्न आत्तापर्यंत गेला आहे. म्हणून महाराज प्रतापगडावरून खाली उतराच्या आधी देवी समोर बसलेल्या अवस्थेत मृत्यूच्या दरबारात जायचा प्रसंग आहे अशा मानसिक अवस्थेत जे विचार येतील ते मांडले आहेत. कादंबरीकारांची भूमिका न घेता लेखन करताना या सारख्या प्रसंगातील व्यक्ती - अफ़झलखान असेल किंवा कोणी अन्य मनात काय विचार करतात ते दाखवायला लागेल इतपत कलात्मक स्वातंत्र्य घेणे वास्तववादी आहे. असे वाटते.
...

सविस्तर प्रतिसाद आता देतो
21 Mar 2020 - 2:17 pm | *दुर्गविहारी*

या लेखमालेचा प्रमुख भाग संपला आहे असे धरुन सविस्तर प्रतिसाद आता देतो.
सर्वात आधी हे लक्षात घेतले पाहिजे की महाबळेश्वरच्या मुंबई पॉईंट किंवा लॅडविक पॉईंटवर उभारल्यास समोर प्रतापगड आणि कोयनेचे खोरे पुर्ण नजरेत येते. याचा संपुर्ण आकार एखाद्या वाडग्यासारखा आहे. त्यामुळे या खोऱ्यात उतरलेल्या माणसाला सहजासहजी सुटणे कठीण आहे. युध्दशास्त्राचा विचार केला तर अश्या सैन्यसंख्या विषम असल्याने गनिमी काव्याच्या युध्दासाठी हि अत्यंत आदर्श जागा आहे. अफ़झलखान वाईवरुन प्रतापगडाच्या पायथ्याशी कसा आला हे वर्णन रंजक आहे. पण
खानाच्या राहण्याची सोय जावळीच्या मोऱ्यानी आपल्या महालात केली.

या वाक्याचा अर्थ समजला नाही. वास्तविक चंद्रराव मोरेचा पराभव करुन जावळी हा प्रदेश शिवाजी महाराजानी ताब्यात घेऊन या परिसरातील भोरप्याच्या डोंगरावर प्रतापगडाची उभारणी केली असा इतिहास असताना, या प्रतापगड युध्दात चंद्रराव मोरे कोठून आला ? हा प्रश्न मला पडला आहे.
महाबळेश्वरच्या लॅंडविक पॉईंटखाली जावळी नावाचे गाव आहे, इथे चंद्रराव मोरेचा वाडा आहे, हे बरोबर. पण दुसऱ्या दिवशी गडवर शिवाजी महाराजांच्या भेटीसाठी प्रतापगडावर जायचे असल्याने तो आजच्या हिशेबाने सात ते आठ कि.मी. वरच्या जावळीत उतरेल असे वाटत नाही. त्याची व्यवस्था वाडा कुंभरोशी किंवा पार या गावच्या हद्दीत केली असावी असे मला वाटते, कारण प्रतापगडावरुन इथे लक्ष ठेवणे सोयीचे होते. उलट उंचीचा फायदा मिळून खानाच्या छावणीवरुन प्रतापगडावरील हालचाली सहजासहजी दिसणार नाहीत. खानानेही बरोबर हेर आणले असणार, पण प्रत्येक वेळा त्याना खानापर्यंत बातमी पोहचवायला, या उंचीच्या फरकामुळे बराच वेळ लागत असणार. तेव्हा ही जागा मला चुकीची वाटते आहे.

१० तारखेला सकाळी भवानी मंदिरात पूजा करताना, त्यांच्या मनात तीन पर्याय आले.
या वाक्याचा अर्थही मला समजला नाही. कारण प्रतापगडाचा प्रसंग १६५९ ला झाला तर महाराजांनी प्रतापगडावर भावानीची स्थापना केली १६६१ मध्ये. मग महाराज भवानी मातेचे दर्शन घेतील हे शक्य वाटत नाही. कदाचित त्यावेळी गडावर असलेल्या केदारेश्वर मंदिरातील भवानीचे दर्शन घेतले असणे शक्य आहे.

१५०० इथे कापले गेले, इथे अडकले ते मेले, इथले शरण आले
हा भाग कल्पना करुनच लिहीला आहे. तरी वाचकांच्या सोयीसाठी थोडी रंजकता ठीक आहे. एक नवीन दृष्टीकोण हि मालिका देती आहे.
बाकी या विषयावर ईंग्लिशमध्ये माहिती देणाऱ्या दोन लिंक देतो. उत्सुकता असणाऱ्यांनी त्या वाचून घ्याव्यात.

Strategic Movements in the Afzhal campaign (चिन्मय दातार ब्लॉग)

Chhatrapati Shivaji vs Afzal Khan: Pratapgad,1659 (अनिश गोखले ब्लॉग)

पुढील भागाच्या उत्सुकतेत.
...

शंका निरसन १

22 Mar 2020 - 12:21 pm | *शशिकांत ओक*

नमस्कार मित्रांनो, मनो आणि दुर्गविहारींनी आपली मते मांडली. आणखी कोणाला काही म्हणायचे असेल तर म्हणून थांबलो होतो. असो.

खालील वक्तव्य कोणाला पटवून द्यायला करत नाही. मात्र माझे विचार कळणे महत्वाचे वाटले म्हणून लिहित आहे.
मनो म्हणतात...

**१० तारखेला सकाळी भवानी मंदिरात पूजा करताना, त्यांच्या मनात तीन पर्याय आले. इथे फोटो तुळजाभवानी मंदिर, तुळजापूर इथला आहे, तो त्याऐवजी प्रतापगडाच्या भवानी मंदिराचा पाहिजे का? कारण महाराजांना त्या वेळी तेच मंदिर सहज पूजा करता येण्याजोगे होते.**

...आधीचा एक फोटो काढून तुळजा भवानीचा फोटो मी सादर केला. तेंव्हा नेमके हेच मनात आले की प्रतापगडावरील मंदिरातील मूर्तीचा फोटो ठेवणे योग्य राहील का? पण विचारांती तो फोटो काढून सध्याचा तुळजा भवानीचा फोटो लावला. माझ्या मनात असे आले की जरी आपण प्रत्यक्षात एका ठिकाणी असलो तरी अनेकदा डोळे मिटले की जिथे आपण नसलो तरी आपल्याला अशा मुर्ती, देखाव्यांशी जवळीक वाटते

तिथे आपला श्रद्धाभाव घेऊन जातो. स्वामीसमर्थांच्या प्रेमींना त्यांचा फोटो, मुर्ती आठवेल, स्वामी नारायण मंदिरात एखाद्याला अयोध्येतील रामलल्लाची मूर्ती आठवेल वगैरे वगैरे... आपल्या सारख्या सामान्यांना असे होते तर मग महाराजांच्या संदर्भात त्यांना तुळजा भवानीचा दृष्टांत झाला होता. ते लक्षात ठेवून प्रतापगडावरील भवानी समोर बसलेले असूनही तुळजापुरच्या भवानीला मनात स्मरण वाटणे म्हणून साहजिक असेल. असे शिवाजी महाराज त्या प्रसंगाला मला जास्त सुयोग्य वाटले.
विचाराल तो काढून टाकलेला फोटो कोणता होता?




**तो हा प्रतापगडावरील भवानीमातेचा होता**

...

शंका निरसन ३

22 Mar 2020 - 7:34 pm | *शशिकांत ओक*

खालील वक्तव्य कोणाला पटवून द्यायला करत नाही. मात्र माझे विचार कळणे महत्वाचे वाटले म्हणून लिहित आहे.
मनो म्हणतात...

**१५०० इथे कापले गेले, इथे अडकले ते मेले, इथले शरण आले... ही माहिती कोणत्याच साधनात मला सापडली नाही, त्यावरून बहुतेक ते तुमचे निष्कर्ष असावेत. जर मूळ माहिती वेगळी, त्यावरून तुमचे निष्कर्ष**

**वेगळे आणि ते तसे का असावेत असं जर थोडं लिहिता आलं तर समजून घेणं सोपं पडेल. नाहीतर मग कादंबरी स्टाईल सर्वच काल्पनिक मानायचे असेल तर तसेही चालेल.**

या ठिकाणी गजानन भास्कर मेहेंदळेंच्या बाबतीतील उदाहरण आठवते. ते प्रस्तावनेत भाग १ पान ४ वर म्हणतात, 'केवळ सुसंगती म्हणजे सत्य नव्हे. केवळ तर्क करून इतिहास लिहिता येत नाही. ... आपल्याला जे तर्कशुद्ध वाटते, ते वाजवी वाटते, तशाच प्रकारे माणसे वागतात असेही नाही... इतिहास नेमका कोणत्या मार्गाने गेला ते निव्वळ तर्क करून ठरवता येत नाही. विश्वसनीय अशा साक्षिदारांकडे म्हणजेच इतिहासातील साधनांकडे चौकशी करूनच ते ठरवावे लागते. पण कित्येकदा या साक्षीदारांनाच अधलीमधली काही माहिती नसते. अशा ठिकाणी, नेमके काय घडले ते माहित नाही असे सांगणे म्हणजे इतिहास सांगणेच आहे. ... कल्पनेच्या वारूवर स्वार होऊन मनमूत संचार करण्याचा मोह तर अगदी कटाक्षाने टाळला पाहिजे.... कित्येक घटनांचे रंजक तपशील किंवा युद्ध शास्त्रीय दृष्टीकोनातून ज्या प्रकारे तपशील मिळावेत असे वाटते त्या प्रकारचे तपशील, बखरांसारख्या निकृष्ठ दर्जाच्या साधनातूनच मिळतात...पण ... (त्या) हकीकती बखरीकारांनीही कल्पनेनेच रंगवलेल्या असतात.... इतिहास म्हणून त्या कल्पनाचित्राचा काही उपयोग नसतो. आणि सत्याधिष्ठित नसल्याने युद्ध शास्त्रीय अभ्यास म्हणूनही ते निरुपयोगी असते. ...

नाव न घेता त्यांनी 'वेध महामानवाचा' या ग्रंथातील दोन अवतरणे देऊन म्हटले, 'जे निर्णय शिवाजीमहाराजांनी घ्यायचे आहेत ते उपर्युक्त चरित्राच्या लेखकांनी स्वतच्च घेतलेले आहेत'....असे म्हणले आहे.

श्री. गजानन मेहेंदळेंसारख्या निस्पृह इतिहासकांचे विचार लक्षात ठेऊन मांडणी करण्याची दक्षता घेतली आहे. याउप्पर काही ठिकाणी दोषात्मकता आली असेल तर जरूर कळवावे त्याला दुरुस्त करायचा प्रयत्न राहील.

...

मेहेंदळ्यांचे वरील विचार मला अत्यंत सुयोग्य वाटले म्हणून वाचकांच्या लक्षात आले असावे की सेनेच्या संख्या, जनावरांच्या संख्येचे तपशील जिथे मान्यता प्राप्त वाटत नाहीत तिथे ते देण्याचे मी कटाक्षाने टाळले आहे. कधी कधी अशावेळी कमीत कमी संख्या देण्याकडे कल आहे. खानाच्या हत्येत वाघनखांचा वापर कि तलवारीचा? कृष्णाजी भास्करांना मारले की सोडले? अशा नक्की निष्कर्ष नसलेल्या बाबींना फाटा देण्याचा प्रयत्न केलेला आहे. जे मार्ग अफ़झलखानाच्या सेनेच्या जाण्या-येण्याचे तयार केले आहेत ते आजच्या काळातील रस्ते, सुविधा, पूल, महामार्ग, धरणे, गावांची विस्तारलेल्या कक्षा यांना शक्यतो वगळून किंवा ध्यानात ठेऊन काढले आहेत. फक्त संदर्भासाठी आता तिथे काय दिसेल म्हणून गोल फोटोत स्थळे, हॉटेल्स, वास्तू दाखवल्या आहेत. सेनेच्या चालीची गती, संख्या, वाटेतील आपल्या आखत्यारीतील असलेले किंवा नसलेले किल्ले, जनावरांच्या गवत, पाण्याची सोय होईल अशा नद्यांचे तीर असे बरेच बिंदू लक्षात ठेवून नकाशे सादर केले आहेत तरीही त्यात खूप सुधारणांना वाव आहे. त्या त्या भागातील दुर्ग प्रेमींच्या ग्रुपमधे सामिल होऊन किंवा त्यांना आपल्या ग्रुपवर सामिल करून जंगल वाटा, खिंडींतून आजही कसे मार्ग सापडतात यावर तरुण गिरिप्रेमींचे सहकार्य घेत राहावे लागते.

आता वरील शंका - मी तयार केलेल्या चित्रातून दाखवलेल्या काही जागांविषयी आहे. त्या त्या ठिकाणी महाराजांच्या फौजेचे कोण सरदार होते? किती सेना होती? त्यांची तैनातगी, खानाच्या फौजेतील शिपायांची हारलेली मानसिकता वगैरेतून त्या भागातील सैन्य मारले गेले असेल असे दाखवले आहे. खानाचे १० रक्षक मारले गेले, त्याशिवाय १५शे पेक्षा जास्त मेल्याच्या संख्यांचे संदर्भ आहेत पण म्हणून १५शे ही कमीतकमी संख्या दर्शवण्याचा प्रयत्न केला आहे. जे त्या ठिकाणापासून दूर होते असे दाखवले आहेत त्यांना पळून जायला शक्य होते म्हणून त्या भागातील वाचले किंवा शरण आले. असे दाखवले आहे. हे फक्त सांकेतिक आहे.

...

शंका निरसन ४ दुर्ग विहारी

22 Mar 2020 - 8:13 pm | *शशिकांत ओक*

खालील वक्तव्य कोणाला पटवून द्यायला करत नाही. मात्र माझे विचार कळणे महत्वाचे वाटले म्हणून लिहित आहे.
दुर्ग विहारी म्हणतात...

**"खानाच्या राहण्याची सोय जावळीच्या मोऱ्यांनी आपल्या महालात केली."**
**या वाक्याचा अर्थ समजला नाही. वास्तविक चंद्रराव मोरेचा पराभव करुन जावळी हा प्रदेश शिवाजी महाराजानी ताब्यात घेउन या परिसरातील भोरप्याच्या डोंगरावर प्रतापगडाची उभारणी केली असा ईतिहास असताना, या प्रतापगड युध्दात चंद्रराव मोरे कोठून आला ? हा प्रश्न मला पडला आहे.**
**महाबळेश्वरच्या लॅडविक पॉईंटखाली जावळी नावाचे गाव आहे, इथे चंद्रराव मोरेचा वाडा आहे, हे बरोबर. पण दुसऱ्या दिवशी गडवर शिवाजी महाराजांच्या भेटीसाठी प्रतापगडावर जायचे असल्याने तो आजच्या हिशेबाने सात ते आठ कि.मी. वरच्या जावळीत उतरेल असे वाटत नाही. त्याची व्यवस्था वाडा कुंभरोशी किंवा पार या गावच्या हद्दीत केली असावी असे मला वाटते, कारण प्रतापगडावरुन इथे लक्ष ठेवणे सोयीचे होते. उलट उंचीचा फायदा मिळून खानाच्या छावणीवरुन प्रतापगडावरील हालचाली सहजासहजी दिसणार नाहीत. खानानेही बरोबर हेर आणले असणार, पण प्रत्येक वेळा त्याना खानापर्यंत बातमी पोहचवायला, या उंचीच्या फरकामुळे बराच वेळ लागत असणार. तेव्हा हि जागा मला चुकीची वाटते आहे.**
...

आपण म्हणता ते बरोबर आहे. महाराजांनी जावळी १६५६ मधे जिंकली होती. ते जावळीच्या नकाशापाशी केलेल्या लेखनातून दाखवले आहे. पण त्यांनी चंद्रराव मोरेला मारलेले नव्हते. तो खानाशी वाईत आल्यावर संपर्कात असावा. खानाला राहायची सोय त्याचा दर्जाला शोभेल अशा जावळीच्या कोटातील महालात (महाराजांनीच) मुद्दाम केली असावी. खानाच्या हत्येनंतर झालेल्या गोंधळाच्या परिस्थितीत मूसाखान मोरेना धरुन आणतो आणि त्याने दिलेल्या वाटाड्यांच्या बरोबर कोयनेच्या उगमाकडून महाबळेश्वरच्या पठारावर जातो असा उल्लेख मेहेंदळे कृत श्री राजा शिवछत्रपती ग्रंथाच्या भाग १ पान ९४० व ९४१ वर आला आहे.
...

तेव्हा आपण पुन्हा एकदा या मुद्द्याचा विचार करावा हि विनंती.

26 Mar 2020 - 10:42 pm | *दुर्गविहारी*

“ आपण दिलेले संदर्भ तपासून पाहिले. मेहंदळे सरानी दिलेल्या पृष्ट क्रमांकावर शिवभारत तसेच सभासदाची बखर ह्या दोन्ही अस्सल साधनात दिलेल्या माहितीत तफावत आढळली. एकतर जेवढे संदर्भ तपासले त्यात शिवाजी महाराजांनी चंद्रराव मोरे ईतकेच नव्हे तर त्याचा भाउ हणमंतराव मोरे या दोघांचा पुर्ण निर्दालन केले हेच सांगतात. प्रतापराव मोरे हा चंद्रराव मोरेचा भाऊ अली आदिलशहाला मिळतो आणि अफझलखानाबरोबर शिवाजी महाराजांवर चालून येतो. (बाबासाहेब पुरंदरेच्या "राजा शिवछत्रपती" मध्ये मात्र हे काम खंडोजी खोपडे करतो असे दिलेले आहे )याचा सरळ अर्थ अफझलखान जावळीतील मोरेच्या वाड्यात उतरला असा नक्कीच नाही. महाराजांनी त्याची व्यवस्था गडाच्या पायथ्याशी म्हणजे वाडा कुंभरोशी येथेच केली असणार. खानाचे पुर्ण निर्दालन करायचे हे नक्की असताना, त्याला गडापासून लांब उतरू देण्याचे कारणच काय ?
तेव्हा आपण पुन्हा एकदा या मुद्द्याचा विचार करावा हि विनंती.”
...

[जर तर च्या गोष्टी](#)
26 Mar 2020 - 11:39 pm | [*शशिकांत ओक*](#)

”महाराजांनी त्याची व्यवस्था गडाच्या पायथ्याशी म्हणजे वाडा कुंभरोशी येथेच केली असणार.”
मला यात पडायचे नाही. आपल्याला तसे वाटत असेल तर तुमच्या दृष्टीने ते बरोबर आहे. बखरी, पोवाडे. अन्य साधने यातून आकलन व्हायला मदत होते...

[शंका निरसन ५ दुर्ग विहारी](#)
22 Mar 2020 - 8:32 pm | [*शशिकांत ओक*](#)

**“या वाक्याचा अर्थही मला समजला नाही. कारण प्रतापगडाचा प्रसंग १६५९ ला झाला तर महाराजांनी प्रतापगडावर भावानीची स्थापना केली १६६१ मध्ये. मग महाराज भवानी मातेचे दर्शन घेतील हे शक्य वाटत नाही. कदाचीत त्यावेळी गडावर असलेल्या केदारेश्वर मंदिरा दर्शन घेतले असणे शक्य आहे.”**
...प्रतापगडावर भवानीचे मंदिर केंव्हा निर्माण झाले या बद्दल मला काहीच म्हणायचे नाही. साधारणपणे प्रत्येक गडावर ईश्वराचे म्हणजे शिवाचे मंदिर स्थापण्याचा प्रघात प्राचीन आहे. शिवाबरोबर पार्वती वेगवेगळ्या रुपाने तिथे असावी असा संकेत ही असावा. म्हणून केदारेश्वरासमावेत भवानी ही असावी. महाराजांनी त्या मंदिरांचा जीर्णोद्धार केला असे मानणे सुयोग्य राहील.

**१५०० इथे कापले गेले, इथे अडकले ते मेले, इथले शरण आले.**
**हा भाग कल्पना करुनच लिहीला आहे.**
यावर आधीच उत्तराचे लेखन केले आहे...

“...या विषयावर ईंग्लिशमध्ये माहिती देणाऱ्या दोन लिंक देतो. उत्सुकता असणाऱ्यांनी त्या वाचून घ्याव्यात.
Strategic Movements in the Afzhal campaign...
Chhatrapati Shivaji vs Afzal Khan: Pratapgad,1659
धन्यवाद वरील लिंक दिल्याबद्दल...”

दिलेल्या लिंकचे लेखक चिन्मय दातार आणि अनीश गोखले यांच्या संपर्कात राहायला आवडेल म्हणून त्यांना ईमेल केली आहे. पैकी अनीश गोखले यांनी वाचून कळवतो म्हटले आहे. पाहू ते काय म्हणतात ते...
मी इतिहासकार नाही. त्यांच्यातील मता-मतांतरात मला गुंतायचे नाही.
तरीही सादरीकरणात काही चुका वाटल्या असतील तर जरूर कळवावे. समजून घ्यायला मला आनंद वाटेल.
...

[आई तुळजा भवानीने महाराजांना दृष्टांत दिला](#)
26 Mar 2020 - 10:52 pm | [*दुर्गविहारी*](#)

“ याबाबत माझे मत इतकेच आहे कि सभासदाची बखर, शिवभारत आणि शिवचरित्रप्रदीप हि तिन्ही साधन हेच सांगतात कि आई तुळजा भवानीने महाराजांना दृष्टांत दिला. अफझलखानाने येताना तुळजापुरात भवानी मातेच्या मंदिराला उपद्रव दिल्याने त्यांनी त्याची आठवण रहावी म्हणुनच कदाचित प्रतापगडावर नेपाळ मधील गंडकी नदीतील शिळा मागवून भवानी मातेची स्थापना केली. लक्षात घ्या शिवाजी महाराजांचा अर्धा आयुष्यकाल राजगडावर जाउनसुध्दा भवानी मातेची स्थापना प्रतापगडावर केली याचा अर्थ त्याना त्या घटनेची आठवण रहावी हाच कदाचीत हेतू होता.”
...

[भवानीमाते ऐवजी ...](#)
26 Mar 2020 - 11:56 pm | [*शशिकांत ओक*](#)

“भवानी मातेची स्थापना प्रतापगडावर केली याचा अर्थ त्याना त्या घटनेची आठवण रहावी हाच कदाचीत हेतू होता.”
सध्याच्या भवानीमातेच्या मंदिरा ऐवजी केदारेश्वर शिवमंदिराच्या गाभाऱ्यात ते बसले होते असे मानले तरी चालेल...
त्यांना मनोमन तुळजा भवानीचा दृष्टांत आठवला असे मला सुचवायचे होते.
आपण इतक्या सुक्ष्म रितीने धाग्यातील कथनाचे वाचन आणि मनन करता आहात म्हणून मला आपल्या गहनशील व्यासंगाचे कौतुक आहे. आपण आपले प्रतिसाद विविध ग्रंथांचे परिशीलन करून लिहिता, असेच इतरांना वरील धाग्यातील माहिती वाचताना वाटावे अशी मनोमन इच्छा आहे.
धाग्यातील लेखनाला इतिहासाची पृष्ठभूमी आहे. परंतु तो इतिहासाला सध्या तरी अज्ञात काही लष्करी लढ्यांच्या ठिपक्यांना जोडायचा प्रयत्न आहे. लढायांच्या जागा, मार्गांच्या शक्यता दाखवतात. पण म्हणून मी म्हणतो तसेच घडले असा दावा करणे मलाही मान्य नाही...
नवीन माहिती मिळवून त्यात भर घालत राहणे आपले कर्तव्य आहे...

माहितीपूर्ण व प्रतिभाशाली मालिका
2 Apr 2020 - 10:49 pm | *गामा पैलवान*

शशिकांत ओक,

जबरदस्त लेखनमालिका आहे. सैनिकी दृष्टीने विचार करून लिहिल्याबद्दल कौतुक आहे. :-)
प्रतिभाशाली म्हणजे घटना थेट डोळ्यासमोर उभी करणारं कथन.

एक दुरुस्ती सुचवू इच्छितो. खानाची सैन्यरचना या शीर्षकाखाली दिलेला नकाशा बुचकळ्यात टाकणारा आहे. कारण की त्यात वरची बाजू दक्षिणदिशेस असून खालची बाजू उत्तरदिशा आहे. त्यामुळे खुणांचे संदर्भ नेमके उलटे झालेत. तेव्हा उत्तर दिशेचा दर्शक बाण दाखवावा ही विनंती. अथवा दुसऱ्या कुठल्याही यथोचित दिशेचा बाण दाखवलेला चालेल.

आ.न.,
-गा.पै.

सूचना लक्षात आली...
2 Apr 2020 - 11:16 pm | *शशिकांत ओक*

“उत्तर दिशेचा दर्शक बाण दाखवावा ही विनंती”
नकाशावर खानाची सैन्यरचना नजरेला ठसावी म्हणून त्या ठिकाणी दिशा दर्शन कमी महत्वाचे होते. गूगल अर्थ वरून गोल फिरत असताना ती दिशा भावली. असो. पुढे लक्षात ठेवले जाईल.

# प्रतापगडाची उलटवलेली बाजी

## भाग ७ पळापळ आणि भराऱ्या

**भाग ७ प्रतापगडावरची उलटवलेली बाजी...पळापळ आणि भराऱ्या**

### अनपेक्षित परिणाम आणि पळापळ

महाराजांनी अफजलखानाला कसे मारले?
याची बातमी कळायला वेळ लागला. ठरवल्याप्रमाणे शिंगे फुंकली गेली. पण नंतर तोफांचे बार निघायला लागले तेंव्हा आपल्या १५शे निवडकांनी प्रतापगडावर चाल करून वर जाऊन तोफा वाजवल्या का सिवाने आपल्या सैन्याला इशारा देऊन आपल्या सैन्यावर तुटून पडायला त्यांचे आधीच ठरलेले होते वगैरे प्रश्नांची उत्तरे संभ्रमित होती.

अफ़झलखानाच्या पश्चात वरिष्ठ म्हणून मुसाखानावर जबाबदारी पडली. एकानी बातमी आणली की अफ़झलखानाची हत्या करून त्याचे मुंडके तोडले आहे. ते ऐकून चकित झालेल्या मूसाखानाने परिस्थितीचा आढावा घेऊन आपल्याकडील सरदारांना निरोप दिला की शक्यतो जावळीच्या कोटाकडे मागे फिरा. त्याने प्रतापराव मोरेला पकडून समोर उभे केले आणि परिस्थितीची अगतिकता, क्रोध येऊन तो अद्वातद्वा झाला. 'तू याला जबाबदार आहेस' म्हणून लाथाडले.

१५शे हशमांपैकी काही थोडे जखमी होऊन परतले तेंव्हा त्यांनी सांगितले की सिवाच्या लोकांनी आमच्यावर अचानक हल्ला केला. आम्ही चिंचोळ्या रस्त्यात अडकून पडलो. काही झाडावर चढून बसले त्यात मी होतो.

सिवा गडावर पळून गेला आहे. त्याला गडावर धरून आणता येईल का यावर खल झाला. ते शक्य नाही. आत्ता जीव वाचवणे गरजेचे आहे असे सर्वानुमते ठरले. फाजल खानाला शोधून आणले. तो भयंकर चिडला होता. त्याचे आणखी दोन भाऊ बेपत्ता होते. दोन तासानंतर ४च्या सुमाराला तातडीने जावळीतून परत वाईला जायचा निर्णय झाला. अंधार पडायच्या आत निसणीचा जंगलातील चढ चढायचे ठरले. होता होता त्यांचा जत्था वाढत होता. घोडेसवारी काही अंतर करून कोयनेच्या उगमापाशीच्या पात्रातुन वर चढताना एकेकांना दम लागला. अंधारातून चाचपडत जाणे शक्य होईल असे वाटले होते पण जंगली श्वापदे जखमांच्या रक्ताचा वास लागून धावून येतील म्हणून सर्वानी एकत्र असलेले चांगले असे ठरले. १० नोव्हेंबरची रात्र तिथेच गेली. पहाटे म.श्वरचे पठार चढताना लागले वे ण्णानदीचे पात्र ओलांडून जाताना मराठ्यांनी आपल्याला कसे बनवले याची बोच त्यांना होती.

## मुसाखान कसा विजापुरात गेला असावा याचे आकलन

| दि | वेळ | कुठून | कुठे कि. मी |
|---|---|---|---|
| १० | सायं काळी | जावळी कोट | निसणी१० किमी घाट |
| ११ | स.६ | निसणी | चिखली१५ किमी |
| ११ | दु. २ | चिखली | वाई १५ किमी(४०) |
| ११ | सा ६ | वाईहून | पाचवड १२ किमी |
| १२ | स ६ | पाचवड | रहिमतपुर ६० कि मी |
| १३ | स ६ | रहिमतपुर | विटा ११० किमी |
| १४ | स ६ | विटा | जत १८० किमी |
| १५ | स ६ | जत | तिकोटा २२५ किमी |
| १६ | स ६ | तिकोटा | विजापूर २३७ किमी |
| १७ | द २ | विजापुर घरी | विजापूर दरबार २४० किमी |




**मूसाखान आणि  बरोबरचे सरदार निसणी घाटातून वाटाड्यांच्या मदतीने वाईला परतले**

**मूसाखान आणि बरोबरचे सरदार निसणी (म्हणजे शिडी) घाटातून वाटाड्यांच्या मदतीने वाईला परतले**

पहाटे उठून म.श्वरवर पठार पार करून मुसाखान आणि अन्य सरदार आपापली शस्त्रे गोळा करून ताय घाटाच्या उताराला पळत सुटली. तायघाट उतरताना त्यांना दुपारचे १२ वाजून गेले. चिखली गावात त्यांना त्यांच्या तळावरील घोडे मिळाल्यावर वाईच्या तळावर ते आले. तिथे घडलेल्या प्रकाराची भीषण बातमी ऐकून

लोकांचा विश्वास बसेना. खानाला कोण कसे मारू शकतो यावर त्यांचे डोके चालेना. आपापल्या सामानानसकट इथून ताबडतोब निघा. आल्या वाटेने जायला लागा. रहिमतपुरानंतर वडूज, मायणी करून जत वरून विजापुरला जाता येते असे त्यातल्या लोकांचा विचार पडला. ते ऐकून लोक हाती येईल ते सामान गुंडाळून निघाले. हत्ती, उंट, मोठ्या जनावरांना दूरवर सोडून द्यायचे ठरले. बैलांवर, घोड्याच्या पाठीवर पडशातून जमेल तसे माल कोंबुन व्यापारी कनाती गुंडाळू लागले. त्यांचे नुकसान अपरिमित झाले होते. खानाबरोबर जाणे म्हणजे फायदाच फायदा असे समीकरण होते. रात्रीपर्यंत बनवलेले खाणे बांधून घेऊन तांडा पुंजक्यानी पाचवडकडे निघाला. मुसाखान आणि त्यांच्याबरोबरचे महत्वाचे सरदार हसन खान, याकूत खान, अंकुश खान, आधीच घोड्यावरून निघून गेले होते. वाटेत सामिल झालेले सैनिक आपापल्या सोईच्या रस्त्यांनी पसार झाले.

वाईचा तळावर अनेक मोठी जनावरे, टाकुन दिलेली बोजड शस्त्रे, कनातीतून रचलेली धान्याची पोती, भटारखान्यातील जळती लाकडे यातून तळ भकास दिसत होता.

पाचवडला पोहोचेपर्यंत रात्र झाली. पहाटे उठून तो जत्था रहिमतपुरकडे निघाला. तिथे १२ ची रात्र काढली. नवे घोडे मिळवले. रोज सकाळी उठून पुढे जात राहिला. औंध घाटाच्या वाटेने पुसेसावळी नंतर विट्याच्या परिसरात १३ तारखेला मुक्काम पडला. १४ ची रात्र जतमधे काढून घोडे बदली झाले. १५ तारखेला रात्री सरदारांचा जत्था पुढेमागे होत तिकोट्याला आला. १६ तारखेला दुपार पर्यंत विजापुरचे उंच घुमट दूर पाहून आपण भयंकर संकटातून वाचलो, आता बडी साहेबा बेगमसमोर काय सांगावे याचा विचार बेचैन करत होता. तारीख १६ जो तो आपापल्या घरी गेला. दुसऱ्या दिवशी, १७ नोव्हेंबर तारखेला त्यांची पेशगी दरबारात झाली. काय घडले ते समजून घेतले गेले. अवाक झालेल्या विजापुरात सन्नाटा होता. ३-४ दिवसांच्या खलबतानंतर आता काय करायला हवे यावर चर्चा होऊन सिवाला तातडीने विजापुरला यायला प्रतिबंध करायचा हुकूम दिला गेला. सिवापेक्षा नेतोजी चालून येण्याची शक्यता वर्तवली गेली.

मोहिमेत सामिल नसलेल्या सरदारांना त्याचे सैनिक एकत्र करून भेटायला कळवले गेले. तोवर जत्थ्या-जत्थ्याने सैनिकांची परतीची रीघ लागली. त्यांच्याकडून कळले की तळ खाली होता होता नेतोजी आपल्या घोडळासह आला होता. सरदार आधीच पळून गेले ऐकून त्याने सिवाच्या वाईत येण्याची वाट पाहिली. मग ते दोघे आपल्या सैन्याची वाटणी करून निघाले. आपल्या पैकी नाईक पांढरे, नाईक खराडे, नाईक कल्याणजी जाधव यांनी सिद्दी हिलालला पुढे घालून रदबदली करून अभय मिळवले आणि ते सिवाच्या सेनेला मिळाले. आम्हाला निशस्त्र पाहून सोडून दिले म्हणून आम्ही वाचलो.

खानाच्या हत्येला एक महिना उलटून गेला होता. सैन्याची भरती करून, काहींना विजापुरात बोलावून डिसेंबरच्या तिसऱ्या आठवड्यात विजापुरकरांनी सिवाच्या विरुद्ध नवी मोहीम सुरु केली. रुस्तुम इ जहानची वरिष्ठता आणि अनुभव लक्षात घेऊन नेता निवडले गेले. अफ़झलखानाचा मुलगा फाजल खान जखमा भरून आल्यावर लढायला उत्सुक होता. त्याने आपल्या बापाच्या हत्येचा बदला घ्यायला मनोमन पण केला होता.

## प्रतापगडावर

१० नोव्हेंबरला गुरुवारी दुपारी भेटीला गेलेले महाराज तासाभराच्या भेटीनंतर तातडीने प्रतापगडावर सुखरूप आलेले पाहून आत्यंतिक आनंद पसरला.. तोफांच्या डागण्या सुरु झाल्या. त्यानंतर हलकल्लोळाच्या आरोळ्या, हरहर महादेवच्या रणगर्जनांनी जंगलातील आसमंत दणाणून जाताना वर गडावर ऐकायला येत होते. महाराजांना कपाळाला किरकोळ जखम झाली होती. गोपिनाथपंत गडावर पोहोचल्यावर त्यांच्यावर अक्षतांनी ओवाळले गेले. दुपार कलल्यावर अंधार व्हायच्या आत अनेक वीर सरदार आपापल्या कडील बातम्या घेऊन आले. खानाचे १४०० - १५०० लपवलेले निवडक सैन्याला परत जाता आले नाही. पारच्या जंगलातील वाटा रोखण्यात अनेकांना मारले गेले. अंधाराचा फायदा घेऊन काही पळाले. काहींनी झाडावर चढून स्वतःस लपवले. वगैरे युद्धाचे अहवाल येत राहिले. आपल्यातील कामी आलेल्यांची गिनती केली गेली. नक्की आकडेवारी करणे शक्य नव्हते. त्याच रात्री महाराजांनी आपल्या मंत्र्यांना बोलावून पंत गोपिनाथांचा आणि महाराजांबरोबर गेलेल्या वीरांचा उचित सन्मान करायचे नियोजन केले गेले. १ लाख भरतील अशा होनांच्या थैल्या तयार करून ठेवल्या गेल्या. दुसऱ्या दिवशी उजाडताच पंतांच्या कार्याला उचित गौरवपूर्ण सन्मान म्हणून मानाचे दागिने, वस्त्रे, १ लाख होनांच्या थैल्या, अर्पण केल्या गेल्या. अनेक वीरांच्या अतुलनीय साहसाचे गौरव त्यांना रोख पैसे, कंठे, कलाकुसर केलेली शस्त्रे देऊन केला गेला तर काहींना मानाचे दागिने, गळ्यात मोत्याच्या माळा व वस्त्रे देऊन त्यांच्या पराक्रमाचा उचित सत्कार केला गेला. चटपटीत नोकर वर्गाला जावळीखोऱ्यातील खानाच्या सैन्याने टाकून दिलेल्या सामानाची विल्हेवाट लावायला नेमले.
महाराजांनी एकत्र बसून सल्ला मसलत केली. त्यात ठरले की अफ़झलखानाच्या हत्येनंतर त्यांच्या कडील मुलुखाची अखत्यारी आपल्याकडे वळवायची अपूर्व संधी आलेली आहे. ज्या सरदारांना, जहागिरदारांना अफ़झलखानाच्या जिंकण्याची खात्री वाटून त्याला आपली सेना, जनावरे अन्य मनुष्यबळ दिले आहे त्यांचे मन वळवून, धाकाने, त्यांच्या भागातील गडावर आपले किल्लेदार नेमून सध्याच्या आपल्या राज्याच्या सीमा विस्तारित करायची ही संधी आहे. सर्व गडांवर फारच कमी मनुष्यबळ हजर असल्याने फारसा प्रतिकार होणारही नाही. मात्र जर कुठे गडाकडून प्रतिकार व्हायला लागला तर त्या ठिकाणी वेळ न घालवता पुढे सरकत राहणे.

पुर्वीच्या बैठकीत ठरवल्याप्रमाणे नेतोजीनी आपले घोडदळ घेऊन प्रतापगडावरील भेटीतुन काय बरे वाईट घडेल याची पर्वा न करता वाईतील खानाच्या तळावर धुमाकूळ घालायचा होता. त्यांनी तिथे पोहोचल्यावर युद्धात कामाला येणारी हवी ती जनावरे, पैसा-अडका, धान्याची रसद, वगैरेवर मुकादम लावून बाकीच्यांना हाकलून द्यायचे होते. आपल्यातील घोडदळाने माझ्याबरोबर येऊन वाईतील परिस्थितीचा आढावा घेऊन विजापुरच्या वाटेने कुठवर जायचे ते ठरवायचे, तोवर आपल्यातील दुसऱ्या तुकड्यांनी वाई ते कोल्हापूर पट्ट्यातील प्रत्येक गडांवर आपल्याकडून प्रतिनिधी पाठवून समेटाने ते गड आपल्या अंमलाखाली आणायला मोहिमा काढायच्या.

आपल्यापैकी दोरोजीनी कोकणातील सरदार चौल, दाभोळ बंदरावर जाऊन तेथील आरमारातील मुगलसत्तेशी ईमानदार सरदारांना धाकाने, मारून टाकून आपले डोलकर, मच्छिमार तांडेल, गुराबांचे मालक, विलायती वखारीतील लोकांना जरब बसवून कल्याण बंदर पासून खालचे सर्व सागरतटाचे अधिकार आपल्याला मिळवायची कामगिरीवर जायचे आदेश दिले.

नव्याने आत्मविश्वास आलेल्या महाराजांच्या समावेत अनेक शिलेदारांना, आपल्या तलवारीच्या पात्यांना, साहसी मोहिमेत जायची संधी मिळणार होती. कालच्या धुमश्चक्रीत सामिल असलेल्या सरदारांनी आपापल्या कडील कामी आलेल्यांच्या, जखमींच्या नातलगांना कळवायची व्यवस्था केली. अंबर खान, रणदुल्लाखान, घाटगे सरदार, खानाचे दोन मुलगे वगैरे कैदींना ओलीस ठेवले गेले.

## शिवाजी महाराज प्रतापगड ते वाई धडक भरारी

| दि | वेळ | कुठून | कुठे | किमी |
|---|---|---|---|---|
| ११ | स १० | गड | गडपायथा | ३ |
| ११ | दु १२ | गड पायथा | जावळी | ६ |
| ११ | रा १० | जावळी | धोबी धबधबा | ९ |
| १२ | स ६ | धोबी धबधबा | वेण्णा तळे | १४ |
| १२ | दु१२ | वेण्णा तळे | पारशी पॉइंट | २७ |
| १२ | दु ३ | पारशी पॉइंट | चिखली | ३० |
| १२ | सा ५ | चिखली | वाईतळाचे नियोजन | ४३ |
| १३ | स ७ | वाईतून नेतोजी सह | कोल्हपुर कडे मोहिमेवर | अंदाजे २०० |

गुगल नकाशातून नद्या, उंच-सखल प्रदेश, गडांची, गावांची मालकी यावरील माहितीतून सादर




### शिवाजीमहाराज प्रतापगड ते वाई धडक भरारी

११ तारखेलाच गौरव समारंभ झाल्यावर महाराजांच्या व निवडक सरदारांसाठी प्रतापगडावरील पागेतील घोडे बाहेर निघाले. खानासाठी नव्याने तयार केलेल्या रडतोंडी घाटातून वाटाड्यांसमावेत म’श्वर पठाराची वाट चढायला सुरवात झाली. पठारावर बाबाजी भोसल्यांनी त्यांना वेण्णा नदी काठच्या जंगलात भेटायची शक्यता होती. त्यांच्याकडील घोडदळ मिळून २ हजारांची भरती होत महाराज ताय घाटातून चिखलीला उतरले. तिथून मेणावलीच्या काठाने वाईच्या कृष्णेचा तीर पकडला.

खानाच्या तळापाशी किती सैन्य उरलेले असावे? तिथे लढाई करायला लागेल अशा तयारीने महाराजांनी आपले सैन्याला पुढे पाठवले व ते वाईच्या अलिकडे सुरक्षित ठिकाणी रात्री राहिले. १२ ता. ला दिवसा तळाची धूळधाण झालेली पाहिली. उरलेल्या सामानसुमानाची विल्हेवाट लावायला काहींना कामाला लावले गेले. नेतोजींचा घोडदळाच्या खुरांनी उडवलेली माती-धूळ लांबून दिसली. ते पाहून नेतोजीकडून काय घडले याची वाट पाहिली गेली. खानाचे सरदार ११ ता.ला रातोरात त्यांच्या येण्या आधीच पसार झाले होते. म्हणून त्यांच्या मागावर नेतोजींना जायला सांगितले गेले. पाचवड वरून रहिमतपुर, वडूज, मायणी, विटे, जत वरून ते गेले असावेत असा अंदाज केला गेला. महाराजांनी त्यांच्या मागे जाताना वाटेतील गडावरील किल्लेदार आपल्याकडून करायला आज्ञा केली. वाईतून परतणाऱ्या मराठा सैनिकांच्या जत्थ्यातील कोणी आपल्यात सामिल करता आले तर जरूर करावे. महाराज वंदन-चंदन गड, अजिंक्यातारा सातारा, परळी भागातून वसंत गडावरून, कराड, तांबवे, मसूर, नेर्ले, कामेरी, उरणला येऊन थांबले. नेतोजीनी खटाव, मायणी, कलेढोण अशा आडवाटेतील खानाच्या महत्वाच्या जहागिरींच्या सरदारांना खंडणी घेऊन आपल्यात सामिल केले. कडेपूर, कुंडल, पलूस, कोळे, बहे बोरगांव वरून नेतोजी वाळव्याच्या आसपास १७ ता.ला नोव्हेंबरला आले. शिराळा मुकाश्यात सैन्य घुसवले. महाराज आष्टे, वडगाव करत कोल्हापूरच्या वेशीवर आले. पन्हाळ्याला वेढा घालून २८ नोव्हेंबरला महाराज गडावर राहायला गेले. गडाची रचना पहात तिथले भव्य वाडे, बागा, मोठे तलाव, शेती करण्यालायक भरपूर मोकळी भूमी, यांची शोभा पाहिली. तटा-तटांवरून

दूरचा परिसर न्याहाळून भविष्यात या गडाचा अनेक अंगानी वापर करायला कसा जाऊ शकतो असे मनात ठसले.

## कोल्हापूर परिसरातील लढाई

कोल्हापूर गाव बाजूला ठेवून, शिरोलीकडून यांनी पन्हाळगडावर जायच्या एकुलत्या मार्गावरील वळचणीची जागा महाराजांनी हेरली होती. दूरदर्शी सेनानायकांचे वैशिष्ट्य असते की ते जेथे जात येत असतात तिथल्या नद्यांच्या पात्रांची ठेवण, त्याच्या आसपासच्या परिसरातील डोंगर-दऱ्या, गावे, गडांची रचना यांचा आवाका त्यांच्या नजरेत ठसतो. तीव्र स्मरणशक्ती त्यांना उपजतच असते. त्यामुळे जे स्थळ, वेळ-काळाचे नियोजन इतरांना सुचत नाही, ते पटकन ठरवून कार्यात रूपांतर करतात.

**महाराजांचे सैन्य पन्हाळ्याहून शिये टेकाडावर दबा धरून असावे...**



विजापुरातील सैन्य गोळा होऊन कोल्हापुरच्या दिशेने निघाल्याच्या बातम्या लक्षात घेऊन महाराजांनी आपले सैन्य २० डिसेंबर पासून कोल्हापुरच्या मैदानी (* गूगल नकाशाच्या सहाय्याने आकलन करून सध्याच्या शिये गावाच्या टेकडी) भागात आणले. आपल्या सोईने शत्रूला लढायला कसे भाग पाडता येईल यावर विचार करून शत्रू पंचगंगा पार करून आला की एका टप्प्यावर घोळक्यात येणाऱ्या फौजेला अचानक गाठून दोन्ही बाजूंनी मारा करून गारद करायची चाल आखली. एका उंच टेकडीवरून निरीक्षण करून हरावल सेनेच्या रचनेत कोण कुठे असेल याचा त्यांनी दूर दिसणाऱ्या हत्ती, उंटांच्या पाठीवरील पताका, झेंडे, झुली यांच्या रंगाचा, आकारांचा विचार करून कोणी कोणावर हल्ला करायचा हे ही ठरले. नेतोजीनी फाजलखानावर, जाधव सरदार याह्या खानावर, सिद्धोजी पवार सादात खानावर, गोदाजी जगताप घाटगे, घोरपडे या आदिलशाही सरदारांवर हल्ला करतील. आपल्या बाजूने लढणारे पुर्वी अफझलखानाकडून लढलेले खराडे, पांढरे, उजव्या दस्त्यावर आणि सिद्धी हिलाल, जाधवराव हरावलच्या डाव्या दस्त्यावर चालून जातील. महाराज मध्यात असलेल्या रुस्तुम ई जमानवर जोखीम हल्ला करायला सज्ज राहतील.

## कोल्हापुरपाशी लढाईची काल्पनिक जागा






एका बाजूला डोंगर, एका बाजूला पंचगंगा नदीचे पात्र, यामध्ये कमीत कमी जागेत कचाट्यात पकडायला सोईच्या डोंगरावर महाराजांचे सैन्य लपून राहिले. मलमूत्र विसर्जन करायची गरज आधीच्या रात्रीच्या आहारावर नियंत्रण करून पाळली गेली. महाराजांच्या जनावरांच्या चारापाण्याची सोय करून त्यांचे सैन्य सकाळी खानाचे सैन्य लोटा घेऊन 'परेड' चालू असताना एकदम लपलेल्या उंच टेकड्यावरून धावून आले. उसळलेल्या धुळीला पाहून खानाच्या सरदारांना आपल्यावर हल्ला येत आहे असे लक्षात आले. त्यांनी शक्य तितक्या सेनेला शस्त्र सज्ज व्हायला पुकारा करून सांगितले. रोट खाणे थांबवून, हत्तीवर स्वार होऊन रुस्तुम इ जमान तयार व्हायला वेळ लागला. तरीही पुर्वापार लढाईचा सराव असल्याने हरावल दस्ते बाणाचे भाते भरून गनीम आपल्या तिरंदाजीच्या आवाक्यात यायची संधी पहात राहिले.

पन्हाळ्याला जायच्या आधीच ही झोंबाझोंबी वाटेत अचानक उपटल्याची बाब खानाच्या सैन्याला हज़म होईना. ते धाडसी होते, शूर वीर होते. घोड्यावर बसून लक्षवेधी बाणांनी शत्रूला लोळवण्यात पटाईत होते. भाले घेऊन समोरच्या घोडेस्वाराला खाली पाडून त्याच्या छातीत शस्त्र निर्दयीपणे खुपसायला लागणारी बेडर वृत्ती होती. तोफखाना चालवायची सज्जता, भरपूर दारुगोळा होता. प्रचंड संख्येने मनुष्यबळ होते. आदिलशाहीतील पैसा पाण्यासारखा वापराची मुभा होती. पठडीतील युद्धतंत्र, बोजड युद्धसाहित्य, कल्पक नाविन्यपूर्ण सैन्य रचना करायची अक्षमता, सरदारांचे आपापसातील मतभेद, हेवेदावे, यातून कोण केंव्हा टोपी फिरवून शत्रूला मिळेल याचा भरवसा नसणे वगैरेंनी जर्जर सेनेचे मनोबल मरायला तयार करण्यात सेनापतीला शक्य होत नसे. त्यामुळे जीव धोक्यात घालून लढत राहायची मानसिकता संपून जायला वेळ लागत नाही. तेच घडले. हत्तीवर तयार होऊन यायला लागलेल्या उशीरामुळे, सरदारांनी आपापल्या शिपायांनी समरांगणात जाऊन कामगिरी करायच्या आधीच काही दस्ते पळून जायची तयारी करायला लागले. अफझलखानाचा मुलगा फाजलखानासाठी हा हल्ला सिवाला मारून बदला घेण्यासाठी मिळालेली संधी होती. मोठ्या आवाजात तो सिवाला ललकारून समोर यायला पुकारत राहिला. 'पळपुट्या, लपून छपून वार करू नकोस, अंगात दम असेल तर समोरून लढ'! पण महाराजांनी त्यांच्या वल्गनेकडे दुर्लक्ष केले. हत्तीवरून येणाऱ्या रुस्तुम इ जमानवर हल्ला करून त्याला हुसकावून लावण्याचा महाराजांचा प्रयत्न होता. जेव्हा तो माघार घेऊन निघेल तेंव्हा लढाई निर्णयकपणे आपल्याकडून जिंकून घेतली जाईल. त्यानंतर आदिलशाहीतून पुन्हा मोहीम अंगावर यायला महिने लोटतील.

तासादोनतासात पळापळीला सुरवात झाली. रुस्तुम इ जमानचा हत्ती पाठ फिरवून मागे हटला. फाजलखान आपल्या सैन्यास उत्साहाने लढा म्हणत राहिला. नंतर बाकीचे सरदार मागे हटलेले पाहून त्यालाही रणांगणात पाठ करून परतावे लागले.

या गदारोळात, बऱ्याच शिपायांचे मुडदे पडले. सिद्दी हिलाल, खराडे, नाईक वगैरेंनी पराक्रम केला. रुस्तुम इ जमान विजापुरकडे परत निघाला. पण विचारांती आपल्या मुकाशातील हुक्केरीत विसावला. अनेक सरदारांना आपल्या पाठलागावर येणाऱ्या महाराजांच्या सैन्यापासून वाचवायला मिरजेच्या किल्ल्यावर सुरक्षित वाटले. काहींना निपाणी, चिकोडी रस्त्यावरून जायला सुरक्षित वाटले. नेतोजी पालकरनी पळून लपलेल्यांच्या ३६ गावागावात, किल्लात जाऊन त्यांना ताब्यात घेऊन खंडणी वसूल करायची मोहीम उघडली. एक दस्ता खेळणा गड सर करायला गेला. तो सर झाला. दाभोळ ते राजापूर, जैतापूरच्या खाड्यातील आदिलशाही गलबते ताब्यात आली. महाराजांनी पन्हाळ्याला जास्त सुरक्षित करण्यासाठी काही सुधारणा केल्या. रस्ते, दरवाजे यावर नव्याने देवड्या तयार करून दक्षता वाढवली. ४ ते ५ हजार शिपायांच्या रोजची भोजन व्यवस्था, जनावरांच्या वैरणीची, पिण्याच्या व वापरायच्या पाण्याचे तलावांची व्यवस्था सुधारली. मेटांवर, चौक्यावर आपले शिपाई लावले. मिरजेच्या कोटाला मिळवायला दिरंगाई होताना पाहून आपल्याकडून सैन्य पाठवून पाहिले.

नाईक, खराडे आपल्या भागात परतले. गडावर आधीपासून असलेल्या सरदारांची नावे, पराक्रम,

सशस्त्र तत्पर शिपायांच्या कलापूर्ण कवायती सायंकालीन मनोरंजनाने भरून गेल्या. बाजी प्रभूंच्या व्यक्तिमत्वाचा ठसा उमटला.

## सांगता

सेना नायक आपल्या स्वतःच्या कर्तृत्वाचा ठसा वैयक्तिक पातळीवर अद्वितीय साहस करून दाखवतो तेंव्हा त्याच्या कुठल्याही कार्याला झळाळी प्राप्त होते. युक्तीच्या गोष्टी सांगणे वेगळे आणि त्या प्रत्यक्षात अमलात आणणे हे सर्वस्वी वेगळा प्रकार आहे. महानायक अडचणी, धोके, विपरीत परिस्थितीत धीराने उत्तर शोधतात. अंमलबजावणी करतात. कधी कधी बाजी उलटतेही...

मानव जातीला भेडसावणाऱ्या कोविडच्या वैश्विक समस्येवर झुंज चालू असताना महानायकांच्या कसोटीचा हा काळ आहे.

जो जीता वही सिकंदर म्हणतात!

**समाप्त**

**काही अन्य माहिती – नकाशे**



कोल्हापुर, मिरज, हुक्केरी, जत, विजापूरच्या प्रदेशाचे आकलन करून देणारा नकाशा आपापल्या भागातील काही गावे शोधता आली तर पहावी म्हणून सादर...




वंदन गड

